

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्स्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष २० वे ]　　जुलै १९६७　　[ अंक १०



वार्षिक वर्गणी ९ रु. ]　　[ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष विसावे | अंक दहावा

# नवभारत

जुलै १९६७

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, 'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५४

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. एम्. जी. नाचण

# पंचायत-राज्य : काही विचार

[ १ ] देशाच्या विकासासाठी तीन अत्यंत महत्त्वाची साधने हवी असतात. मानवी बळ ( भौतिक आणि अभौतिक ), वस्तुसाठा आणि द्रव्यबळ. आपल्या देशात वस्तुसाठा आणि द्रव्यसाठा अपुरा आहे, पण मानवी बळ भरपूर आहे. या फाजील मानवीबळाच्या साह्याने अपुऱ्या वस्तुसाठ्यावर व द्रव्यसाठ्यावर प्रक्रिया करण्याच्या हेतूने ' समाजविकास योजनांची ' कार्यवाही ग्रामीण विभागात पहिल्या पंचवार्षिक योजनेपासून करण्यात आली. पण ग्रामीण विभागात, –मागासलेल्या विभागात–, फाजील असलेले मानवी बळ योजनांच्या कार्यवाहीत भाग घेण्यास तयार नसल्याने त्यांच्या त्रयस्थ भूमिकेची चौकशी कै. बलवंतराय मेहता कमिटीने १९५७ साली केली. कमिटीने असा निष्कर्ष काढला की, योजनांच्या कार्यवाहीत जनतेला सहकार्य करण्यास कारणीभूत करणारे एखादे आकर्षक साधन लोकांच्या हातात दिले पाहिजे. त्यांनी सुचविलेल्या साधनास निरनिराळ्या राज्यांनी योग्य तो नीट आकार दिला व त्यास नाव दिले– पंचायतराज्य.

समाजविकास योजना व पंचायतराज्य यांच्यामुळे देशातील ७५ टक्के लोकांचे जीवनमान सुधारले जायचे आहे. या ग्रामीण विभागातील ३५९ दशलक्ष लोकांना चैतन्यमय जीवनमान उपभोगण्यासाठी समाजविकास योजनांमार्फत नियोजनांचे कार्यक्रम कार्यान्वित करण्याची पूर्ण जबाबदारी पंचायतराज्याकडे सोपविण्यात आली.

ग्रामीण विभागातील लोकांच्याकडे असलेली अपुरी व पावसावर अवलंबून असणारी शेती, त्यांना वर्षातील ८ महिने कंठावे लागणारे बेकार जीवन, त्यांचे दारिद्र्य, त्यांचेकडे असलेला भांडवलाचा संपूर्ण अभाव, त्यांचा कर्जबाजारीपणा, त्यांना बाजारच्या लाभणाऱ्या अपुऱ्या सोयी, त्यांच्यावरील पुरातन धार्मिक रूढींचा प्रभाव, त्यांची निरक्षरता यामुळे या विभागातील बहुसंख्य जनता दारिद्र्य आणि मागासलेपणाच्या चक्रव्यूहात जी अडकून पडली होती तिला स्वावलंबी–म्हणून विकासाच्या वाटेवर– बनविण्याच्या ईर्षेने समाजविकास योजना प्रथमतः विकास गट अधिकाऱ्यांच्या मार्गदर्शनाखाली प्रत्येक विकास गटामार्फत कार्यवाहीत आणण्याचा प्रयत्न सुरू झाला. पण या प्रयत्नात जनता सहभागी होत नाही, त्यामुळे अपेक्षित विकास होत नाही; असे पाहून पंचायतराज्य–लोकशाही विकेंद्रीकरण– प्रयोग या देशात ५–६ वर्षे सुरू आहे. प्रस्तुत निबंध पंचायतराज्याची वाटचाल तपासण्याचा प्रयत्न करणार आहे.

[ २ ] पंचायतराज्य सुरू होऊन थोडे दिवस झाले आहेत. त्याच्या यशापयशासंबंधी विधाने करण्यासाठी आणखी काही काळ जाऊ दिला पाहिजे; पण आजपर्यंतची या संस्थेमार्फतची प्रगती योग्य मार्गावर आहे की नाही हे पाहाणे जरूरीचे आहे असे प्रामाणिकपणे वाटते.

[ ३ ] पंचायतराज्य ही संस्था ' समाज विकास योजना'चे अपयश धुऊन काढण्यासाठी निर्माण झालेली आहे. घटनेच्या ४० व्या कलमाप्रमाणे ग्रामपंचायतींना स्थानिक स्वराज्य संस्था म्हणून काम करता यावे व तसे अधिकार देण्यासाठी पंचायतराज्य स्थापन झाले आहे असे म्हणता येणार नाही; कारण तसे असते तर पंचायत राज्यास जास्त अधिकार दिले असते.

ग्रामीण जनतेस स्वावलंबी ( Self–reliant ), जबाबदार ( Responsible ) व राष्ट्रहिताबद्दल जागरूक ( Responsive ) बनविणे हे समाजविकास योजनांचे प्रमुख ध्येय होते. पैकी कोणत्याही ध्येयाकडे ग्रामीण जनतेस नेता येणे समाज विकास योजनांस जमले नाही. कारण शेकडो वर्षापासून स्वतःच्या चरितार्थासाठी निसर्गावर अवलंबून राहाणारी जनता या योजनांमुळे सरकारवर अवलंबून राहाण्यात आनंद मानू लागली. अशा जनतेस स्वावलंबी



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बनविण्याऐवजी तिच्या तात्पुरत्या गरजा भागविण्याचा कार्यक्रम समाज विकास योजना हातात घेऊ शकली. पंचायतराज्याच्या प्रस्थापनेमुळे त्यात बदल झालेला नाही.

पंचायतराज्याच्या स्थापनेनंतर विहिरी, रस्ते, बी-बियाणे, खतपुरवठा, खरेदीविक्री-व्यवस्था थोड्याशा प्रमाणात होत असली तरी त्यामुळे वा इतर काही कार्यक्रमामुळे कृषिउत्पादनात वाढ करण्याचा काही भरीव कार्यक्रम पंचायतराज्य हातात घेऊ शकले आहे असे आढळून येणार नाही. या अनुरोधाने निष्कर्ष असा काढता येईल की, ग्रामीण विभागातील लोकांना स्वावलंबी बनविण्याचा प्रयत्न पंचायतराज्यामार्फत आजपर्यंत झालेला नाही. लोकांनी स्वतःच्या प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठी कार्यक्रमांची आखणी व कार्यवाही करण्याची संधी दिली की लोक जबाबदार बनतात. या विकेंद्रित लोकशाहीच्या सर्वसामान्य तत्त्वाचा अवलंब 'पंचायत राज्य' या कल्पनेत केला आहे. त्यातील तीन स्तरी ( Three tier – ग्रामपंचायत, तालुका-पंचायत समिती, जिल्हा परिषद) पद्धतीकडे सोपविलेले अधिकार व्यवस्थित तपासून पाहिले तर मोठाल्या शहराच्या कार्पोरेशन इतकेच आहेत. त्यातही महत्त्वाचा स्तर जो ग्रामपंचायत, तिच्याकडे येणारी साधनसामुग्री इतकी मर्यादित आहे की, स्वतःच्या गांवाच्या योजना आखण्यासाठी सुद्धा त्यांचा त्यांना उपयोग होऊ शकत नाही. दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे पंचायतराज्य ही कल्पना खेडे एकजिनसी समूह आहे या कल्पनेवर आधारलेली आहे. २५ वर्षापूर्वी व आजही पूर्वी असलेले जाति-संस्थेचे प्राबल्य लक्षात घेऊन, व आज तिची पकड बरीच ढिली झाली आहे ही वस्तुस्थिती मान्य करून-सुद्धा, खेड्यातील, समाज कधी एकजिनशी होता किंवा आहे हे विधान वादग्रस्त आहे. त्यामुळे पंचायत राज्यामार्फत अधिकार राबविण्याची संधी सर्वांना व सर्वांच्या करिता असू शकेल हे पटत नाही. तिसरी लक्षात घेण्याची गोष्ट डॉ. व्ही. के. आर. व्ही. राव यांनी कबूल केली आहे की, जिल्हा परिषदांचे सभासद कार्यक्षम असतानासुद्धा जिल्हा–योजना अधिकाऱ्यां-करवीच तयार केल्या जातात. लोकनियुक्त सभासदांनी जिल्हा योजना तयार करण्याची जबाबदारी पार पाडलेली नाही. अमेरिकन समाजशास्त्रज्ञ टेलर म्हणत असल्याप्रमाणे "पंचायतराज्य हा शासनाचा कार्यक्रम" – जबाबदारी पार पाडीत असलेल्या लोकांचे प्रतिबिंब त्यात दिसत नाही.

[ ४ ] अ :– पंचायतराज्य जिल्हा परिषद, तालुका पंचायत समित्या वा ग्रामपंचायती आपले अधिकार उपभोगण्यासाठी वा कर्तव्ये पार पाडण्यासाठी स्वतःच्या अधिकारासंबंधी कायदे करू शकत नाहीत. प्रांतीय सरकार समाज विकास योजनांची कार्यवाही करताना उपलब्ध साधनसामुग्रीचे वाटप करण्याची कामगिरी फक्त जिल्हा परिषदांकडे सोपविते. त्यातही वाटप व्यवस्थेत अशा तऱ्हेच्या मर्यादा जिल्हा परिषदांवर घातल्या गेल्या आहेत की; काही नवे प्रयोग करावे, काही नवी व्यवस्था करावी; असे ठरवूनसुद्धा जिल्हा परिषदा स्वतःच्या निर्णयाची कार्यवाही करू शकत नाहीत. म्हणजे आजच्या पंचायत राज्यास लोकशाही विकेंद्रीकरण पूर्ण अर्थाने म्हणता येणार नाही. A will to will general will असे अन्नमंत्री श्री. शिंदे त्याचे जे वर्णन करतात त्यास घोषणेशिवाय जास्त अर्थ नाही. प्रांतीय सरकारमार्फत ग्रामीण भागातील लोकांना थोड्या फार प्रमाणात दिल्या जाणाऱ्या मदतीची मध्यस्थ व्यवस्था म्हणजे आजचे पंचायतराज्य.

हे पंचायतराज्याचे स्वरूप बदलणे जरूरीचे आहे. सामूहिक विकासाचे चैतन्य रुजविणे– वाढीस लावणे– हा पंचायतराज्याच्या स्थापनेचा प्रधान हेतू आहे. पण अधिकाराच्या मर्यादेच्या अनुभवामुळे– अधिकारावर असल्याने वैयक्तिक चंगळ होते हे माहिती असून-सुद्धा– जिल्हा परिषदांचे सभासद; पदाधिकारी व तालुका पंचायत समितीचे पदाधिकारी इत्यादी सभासदांची विकास योजनेबद्दलची आकर्षणे कमी होऊन त्यांच्यात शिथिलता आलेली आहे. लोकांच्या भागीदारीशिवाय कोणत्याही योजना अपेक्षेप्रमाणे यशस्वी होत नाहीत. लोकांची भागीदारी मिळविण्यासाठी त्यांना प्रथमतः तसे प्रवृत्त करावयास हवे व त्यासाठी त्यांचेकडे सत्तेचे फक्त प्रतिनिधित्व ( Delegation of Powers ) सोपवून चालत नाही. त्या सत्ता ( Powers ) त्यांच्याच आहेत याची खात्री पटली









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाहिजे. त्या शिवाय योजनांना भरीव सहकार्य मिळू शकणार नाही.

( ब ) :– पंचायतराज्याचे लोकनियुक्त स्वरूप पाहिले तर : ( १ ) ग्रामसभा ( २ ) ग्रामपंचायत ( ३ ) तालुका पंचायत समिती ( ४ ) जिल्हा परिषद या चार संस्थांवर निवडून येणारे सभासद यात २ व ४ चे प्रत्यक्ष व ३ चे अप्रत्यक्ष पद्धतीने निवडून येतात. एकदा निवडून आले की त्यांच्या सर्व प्रकारच्या विकाससंबंधीच्या निर्णयास मतदारांची 'संमती' असते असे गृहीत धरतात म्हणजे याठिकाणी 'लोकांची संमती असणारी लोकशाही (Democracy by consent.)' जी या देशाला नवी नाही, तीच कार्य करीत आहे. – प्रत्येक निर्णयात मतदारांची भागीदारी असलेली लोकशाही ( Democracy by Participation ) तत्त्वाचा अद्यापिही स्वीकार येथे झालेला नाही, मग भागीदारीची अपेक्षा लोकांच्या कडून कशी करता येईल ? वास्तविक अत्यंत महत्वाचा स्तर जो 'ग्रामसभा' की जेथे 'लोकशाहीत भागीदारी' खरीखुरी अनुभवास येऊ शकेल त्याकडे आपले पूर्णपणे दुर्लक्ष झालेले आहे, आणि त्यामुळेच 'लोकशाही कारभारास संमती' व 'लोकशाहीतील भागीदारी' यामध्ये असलेले अंतर पंचायत राज्याच्या प्रस्थापनेमुळे कमी होण्याऐवजी खालच्या थरातही जाणवू लागले आहे आणि 'लोकांचे सहकार्य' मिळविण्यासाठी कार्यक्षमतेने वापरता येऊ शकणारे साधन आजपर्यंत तरी यशस्वी ठरलेले नाही.

ग्रामीण विभागातील लोकांचे प्रश्न ग्रामसभांच्या वारंवार बैठकांमुळे स्पष्ट होतील व त्यांचे उपायही तेथेच नक्की होऊ शकतील. लागणारी जादा साधनसामुग्री पुरविण्याची जबाबदारी, तांत्रिक सल्ला. फक्त तालुका पंचायत समिती, जिल्हा परिषदांनी द्यावा. तालुक्यांचे वा जिल्ह्यांचे सांकलिक प्रश्नांचा विचार मात्र तालुका पंचायत समिती व जिल्हापंचायत यांनी करावा.

[५] समाज विकास योजनांची कार्यवाही पंचायतराज्यामार्फत करताना 'योजना आपल्यासाठी' ही भावना ( We feelings ) लोकांच्यात निर्माण करण्यासाठी कर्तृत्ववान व जिद्दीच्या नेतृत्वाची गरज महत्त्वाची होती. असे नेतृत्व निर्माण करण्यासाठी काही आकर्षणे पंचायतराज्यांनी दाखविली आहेत.

( १ ) लोकांची कामे करवून घेणारा, ( २ ) लोकांचे प्रश्न सोडविणारा ( ३ ) लोकांच्यात स्वतः, स्वतःचा गाव, तालुका, जिल्हा, प्रांत, देश सुधारण्यांची जिद्द निर्माण करणारा व त्यासाठी (अ) लोकांच्याबद्दल सहानुभूती बाळगून लोकांचे प्रश्न आपले मानणारा ( Patron ), ( ब ) लोकांच्या प्रश्नामध्ये मध्यस्थांची–निवाड्यांची–भूमिका स्वीकारून ते प्रश्न सोडविणारा ( Arbitrator ), ( क ) बाहेरच्या क्षेत्रातील योग्य असणाऱ्या सुधारणांचा अवलंब लोकांना करण्यास भाग पाडणारा (Broker), ( ड ) नियोजक ( Planner ) अशा भूमिका जो नेता घेऊ शकतो, त्याच्याकडून समाजविकासाच्या कार्यक्रमाची कार्यवाही उत्तमपणे होण्याची शक्यता असते. या दृष्टीने आजचे पंचायतराज्य त्यातील 'बहुमताने विजयी' या निकालपद्धतीमुळे अशा तऱ्हेचे गुण असलेले नेतृत्व वर येऊ शकत नाही. आज ज्याच्या जवळ पैसा आहे, जो बहुसंख्य जमातीचे प्रतिनिधित्व करू शकतो, ज्याला स्वतःच्या केलेल्या व न केलेल्या कार्याची प्रभावीपणे जाहिरात करता येते, असाच माणूस निवडून येऊ शकतो. त्यामुळे उमदा, अचूक निर्णय घेऊ शकणारा, बुद्धिमान, निश्चयी, समाज सेवेस वाहून घेऊ शकणारा-ज्याची कधीही नव्हती एवढी आज गरज आहे–असा माणूस निवडून येऊ शकत नाही. शिक्षणाचा प्रसार जसजसा होत जाईल तसतसा यामध्ये फरक होत जाईल, असेही वाटत नाही.

त्यासाठी श्री. जयप्रकाश नारायण यानी सुचविलेली अप्रत्यक्ष निवडणूक पद्धती (पंचायत राज्यापुरतीच ) अवलंबली पाहिजे असा आग्रह धरावासा वाटतो. कारण मी वर म्हटल्याप्रमाणे पंचायतराज्यात कसदार नेतृत्व त्यामुळे निर्माण होईल व पंचायतराज्याचे रूपांतर विकेन्द्रित लोकशाहीत झाल्यास शासनयंत्रणेस शासनव्यवस्थेतच फक्त गर्क होणे भाग पडेल.

[६] १९६१ मध्ये हैदराबाद येथील 'समाज विकास योजना व पंचायतराज्य' या संबंधीच्या वार्षिक परिषदेत पंचायतराज्याची प्रगती खालील कार्यानुरोधाने होत राहावी असे ठरले होते. त्यानुसार–

( अ ) शेतकी उत्पादनास अग्रप्राधान्य ( ब ) ग्रामीण उद्योगधंद्याचा विकास ( क ) स्थानिक साधन-



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सामुग्रीचा विकास (ड) आर्थिक दृष्ट्या कमजोर वर्गांना प्राधान्य, – इत्यादी बाबींवर पंचायत राज्याने विशेषकरून लक्ष पुरवावे असे ठरविले होते.

यामध्ये शेतकी उत्पादनास अग्रस्थान द्यावे असे ठरले असले तरी त्यासंबंधी काहीही भरीव स्वरूपाचे कार्य पंचायत राज्याकडून झाले नाही. औद्योगिक क्रांतीला तेव्हाच वेग येतो की जेव्हा कृषि उत्पादन क्षेत्रात क्रांती घडून येते. पंचवार्षिक योजनांच्या कार्यवाहीमुळे औद्योगिक क्षेत्रात उत्पादनवाढ दृग्गोचर होण्याइतकी झाल्याने कृषिक्षेत्राकडे दुर्लक्ष झाले व ७५ टक्के लोक अवलंबून असणाऱ्या कृषिक्षेत्रात देशाच्या गरजेइतके सुद्धा अन्नधान्य उत्पादन होऊ नये, याचे आश्चर्य वाटल्याने सरकारने या क्षेत्रांकडे लक्ष देण्याचे ठरविले आणि त्यासाठी साधनांची शोधाशोध सुरू झाली. पंचायतराज्याची या कार्यासाठी आठवण झाली. (मूळच्या मेहता कमिटीने पंचायत राज्याकडे अन्नधान्य उत्पन्न वाढ कार्य प्रामुख्याने सोपविले नव्हते.) या अन्नधान्य उत्पादनवाढ कार्यक्रमाचे मर्म अजूनही पंचायतराज्यास सापडले नाही. वास्तविक त्यांनी त्यांच्या क्षेत्रातील जमिनीच्या मगदुरांची व पाणी पुरवठ्याच्या उपलब्ध साधनसामुग्रीची शास्त्रशुद्ध पाहणी करावयास हवी होती.

(अ) पाणीपुरवठा सोय मिळवू शकणारी. (ब) अजिबात पाणी न मिळणारी, त्याबरोबरच जमिनीची कसाप्रमाणे गटवारी करून त्या त्या गटास पाणीपुरवठा होऊ शकणाऱ्या जमिनीस योग्य प्रकारचे बी बियाणे, खत व तंत्र पुरवावे; किंवा जिराईत जमिनीतसुद्धा तिच्या मगदुरात टिकाव धरू शकेल असे वेगळे प्रकारचे (उदा० हल्ली संकरपद्धतिद्वारा तयार झाले आहे) बियाणे, खत व तंत्र पुरविण्याचा कार्यक्रम हाती घेता येणे शक्य होते. तसे निदान आता तरी करावयास हवे.

पंचायतराज्यामार्फत-समाजविकास योजनांमार्फत-पुरविल्या जाणाऱ्या सेवांमुळे मदतीचा झरा श्रीमंत 'सधन' शेतकऱ्याकडे वळतो आहे. ज्यांना खरी मदत मिळणे जरूरीचे आहे, त्यांच्याकडे ती अजूनही पोहोचू शकत नाही. त्यामुळे ग्रामीण विभागातील विषमता कमी होण्याऐवजी वाढण्यास मदत झालेली आहे.

पंचायतराज्याकडे त्यासाठी पुरेसा पैसा उपलब्ध नाही, ही वस्तुस्थिती आहे. जादा पैसा उभारण्याचे मार्ग त्याकडे मर्यादित आहेत. यासाठी चार गोष्टी होणे जरूरीचे आहे.

(१) मध्यवर्ती व प्रांतीय सरकारची अनुदाने वाढली पाहिजेत.

(२) पंचायतराज्य संस्थांनीच जनहिताच्या दृष्टीने उत्पन्नवाढीचे नवे मार्ग शोधण्यासाठी लोकक्षोभाची भीती टाकून दिली पाहिजे.

(३) मध्यवर्ती व प्रांतीय सरकारच्या पैसा उभारण्याच्या अस्पर्शी मार्गांचा (नवे कर, कर्ज इत्यादी) अवलंब करण्यांचे अधिकार पंचायतराज्यास मिळाले पाहिजेत.

(४) आजचा पंचायतराज्याचा शासनव्यवस्थेचा खर्च (एकूण खर्चाच्या सुमारे ३५ टक्के रक्कम) एकूण कमी केला पाहिजे. वरील बाबींची पूर्तता होण्यासाठी या संस्थांकडे असणारा अधिकारीवर्ग शासनव्यवस्थेत पूर्णपणे गुरफटला जाऊ नये. तालुका पंचायत समितीकडे असणारा बी. डी. ओ. हा तांत्रिकदृष्टीने खुजा पडतो.

[७] बी. डी. ओ. हा पंचायत राज्यापूर्वी त्याच्या ब्लॉकचा सरकारने पगार देऊन नेमलेला अधिकारी होता. पंचायतराज्य स्थापनेनंतर तो, तालुका पंचायत समितीचा कार्यवाह म्हणून काम पाहू लागला. 'ज्यांच्यात नेतेपणाचे गुण असतात तो उत्तम कार्यवाहही असू शकतो' हे चुकीचे गृहीत त्याच्याबाबतीत राबविले जात आहे. आजचा बी. डी. ओ. म्हणजे सिमेंट वाटप करणारा, बी–बियाणे, खते, औषधे पुरविणारा, शाळा तपासणारा, अधिकारी झाला आहे. त्याला कृषिउत्पादन तंत्राची शास्त्रशुद्ध आणि व्यावहारिक माहिती असण्याची शक्यता अल्पशीच असल्याने पंचायत राज्याच्या प्रधानकार्याशी कार्यकारणभावाने त्याचा संबंध जवळजवळ असू शकत नाही. तरीसुद्धा सरकारने नेमणूक केली म्हणून 'जीप बाळगणारा' त्यामुळे सदोदित पाटलाच्या घोडीवर... यामुळे त्याचा भाव बराच खाली आलेला आहे. तो कुचकामी ठरलेला आहे. त्यास शासनव्यवस्थेवर देखरेख एवढीच कामगिरी करू द्यावी व नव्याने सुचविल्याप्रमाणे प्रत्येक ब्लॉकला ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ऑफिसर नेमला जावा की, जो पंचायतराज्य कार्यक्रमावर क्षेत्र देखरेख ( Field Supervision ) करू शकेल. शेतकऱ्याला सल्ला देणे, मार्गदर्शन करणे आणि प्रोत्साहन देणे ही कार्ये त्यालाच करता येतील.

दुसरा अत्यंत महत्वाचा अधिकारी म्हणजे एस्. इ. ओ. ( Social Education Officer ). विकासगट स्थापनेवेळी समाजामध्ये आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक विकासाची जिद्द पेटविणारा, स्वविकासार्थ व्यक्तीस सरकारी योजनात हिरीरीने भाग घेण्यास उद्युक्त करणारा म्हणून या एस्. ई. ओ. चा फार गवगवा झाला. महिला मंडळ, युवक क्लब, भजनी मंडळ, खेळ, बालवाडी, यात्रा, प्रदर्शने, सोशल कॅम्पस, मनोरंजन वगैरे संधीच्या साह्याने ग्रामीण लोकांना भेटणारा; त्यांच्यात स्वतःविषयी व सरकारी योजनांविषयी आपुलकी निर्माण करणारा म्हणून त्यांची कामगिरी निश्चित केली होती. पण आज एस. ई. ओ. म्हणजे ए. डी. आय. असे समीकरण झाले आहे. आणि पंचायतराज्याचे अत्यंत महत्त्वाचे उद्दिष्ट 'सामूहिक विकासाची आस' हे पूर्णपणे बाजूला पडले आहे. एस्. ई. ओ. खूप खुजा आहे. त्याच्याऐवजी या कार्याच्या तोलाचा कार्यक्षम एस्. ई. ओ. नेमणे जरूरीचे आहे.

[८] वर नमूद केलेले व इतर पंचायतराज्याकडील अधिकारी अजूनही जुन्या चौकटीतच काम करणारे आहेत. सरकारी नियमांवर बोट ठेवून त्यांची कामे चालतात. त्यामुळे तपासणी, हुकूम. मेमो, खालच्या अधिकाऱ्यांच्या कामात शंका, या चक्रव्यूहात ते रंगाळलेले आहेत. लोकनियुक्त किंवा शासनसंस्थेत असणाऱ्या हाताखालील लोकांना विकासकार्यात सल्ला देऊन मार्गदर्शन व प्रोत्साहन करणारा अशी भूमिका अधिकाऱ्यांनी घेतल्याशिवाय ग्रामीण विभागातील लोकांशी त्याची 'जवळीक' प्रस्थापित होऊ शकणार नाही.

अत्यंत निकडीच्या वेळी लोकांच्या उत्साहास उधाण आणण्याच्या दृष्टीने व लोकांच्या अपेक्षा पूर्ण करण्याच्या दृष्टीने हे विकासाधिकारी खुजे आहेत ( They lack a leadership in a big temperament ) त्यांची उंची वाढविण्यासाठी त्यांना योग्य प्रकारचे तांत्रिक ज्ञान देणारे शिक्षणप्रकल्प सुरू केले पाहिजेत. सध्याच्या त्यांच्या शैक्षणिक सोग्रीची प्रत वाढवावयास पाहिजे.

[९] पंचायतराज्य आणि पर्यायाने भारतीय लोकशाही यशस्वीरीत्या राबविण्यासाठी लोकांच्यामध्ये समाजहितासंबंधी एकजिनसी भावना निर्माण करणे हे प्रथम क्रमांकाचे कार्य आहे. अशा एकजिनसी सामूहिक विकासाची आस वाढविण्यासाठी आजच्या पंचायतराज्याचे अधिकार वाढविणे जरूरीचे आहे. त्यामुळे व पंचायतराज्याच्या शासनाधिकाऱ्यांच्या कार्यक्षम कार्यामुळे लोकांचे योजनांशी सहकार्य वृद्धिंगत होऊन योजनांची अपेक्षित उद्दिष्टे गाठता येणे शक्य होईल.

आजचा रामरगाडा अपेक्षित फल गाठू शकणार नाही. अनपेक्षित अहितकारी बीजाचे वृक्ष फोफावण्यास मात्र त्यामुळे मदत होईल.

---


# महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना

लेखक-चा. अ. दाभोलकर

किं. २ रुपये

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( सातारा )




अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. सौ. गार्गी सरदेसाई

# अर्वाचीन मराठीतील प्रारंभीचे शास्त्रीय वाङ्मय

## पहिली पन्नास वर्षे (उत्तरार्ध)

### वैद्यक

१८२८ पासून पुढील पन्नास वर्षांमध्ये या शास्त्रावर लिहिल्या गेलेल्या ग्रंथांची संख्या बरीच मोठी आहे. यात संस्कृताची भाषांतरे, काही पाश्चात्त्य ग्रंथाच्या आधारे लिहिलेली व काही स्वतंत्र आहेत. वैद्यक आणि ज्योतिष ही दोन्ही शास्त्रे प्राचीन भारतात उच्च अवस्थेला जाऊन पोहोचली असली पाहिजेत. या व्यतिरिक्त मराठी भाषेत प्राचीन कालात ग्रंथरचना झाल्याची माहिती कोठे मिळत नाही.[1]

मुंबईचे[2] ग्रांट मेडिकल कॉलेज १८३८ मध्ये स्थापन झाले. येथे प्रारंभी इंग्रजी वैद्यक मराठी भाषेच्या द्वारे शिकविण्याचे वर्ग असत. यातील विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठी तेथील शिक्षकांनी इंग्रजी ग्रंथांच्या आधाराने मराठी भाषेत सातआठ पुस्तकें लिहिली. प्राचीन काळातील वैद्यकविषयक विवेचनाची परंपरा असल्यामुळे या विषयातील परिभाषेला पूर्वीची काही पार्श्वभूमी तयार होती. या विषयावर डॉ. जॉन मॅकलेनन यांनी १८२८ मध्ये 'औषधकल्पनाविधि' व 'निदान' आणि नंतर १८५२ मध्ये 'शारीर' हा ग्रंथ लिहिला. या खेरीज 'मानुष शारीरशास्त्र' हा भिकाजी अमृत चोभे यांचा १८६३ मध्ये व नारायण दाजी यांचा 'औषधीविद्या' (१८६५) इत्यादी ग्रंथांचा परिभाषेच्या दृष्टीने विचार करणे अवश्य आहे. याखेरीज बापू गंगाधर जोशी यांनी, चिंतामण जोशी वैद्य व रामचंद्र भट्ट योग्यी यांच्या साह्याने १८३९ मध्ये निघंटप्रकाश या नावाचा नऊ प्रकरणात विभागलेला एक ग्रंथ आढळतो. याच धर्तीचा 'निघंटरत्नाकर' हा ग्रंथ १८६७ मध्ये प्रसिद्ध झाला. कृष्णशास्त्री भाटवडेकर यांनी संस्कृतमध्ये ग्रंथावरून वैद्यकविषयक असे 'वैद्यावतंस' (१८६०), 'वैद्यजीवन' (१८६१), 'वैद्यामृत' (१८६२), 'व्यंत्रकी' (१८६३), इत्यादी पाचसहा ग्रंथ लिहिले हे सारे संस्कृतग्रंथाच्या आधारे लिहिले गेले आहेत. या खेरीज डॉ. सखाराम अर्जुन, गोपाळ शिवराम वैद्य इत्यादी लेखकांनीही उल्लेखनीय कामगिरी केली आहे. या व्यतिरिक्त आणखी कित्येक ग्रंथ वैद्यकीय विषयावर प्रसिद्ध झाले. या विषयावरील परिभाषेची कल्पना येण्यासाठी प्रारंभीच्या दोनतीन ग्रंथातील परिभाषेचा उल्लेख केल्यास या विषयावर त्या काळात परिभाषा तयार करण्याचे प्रयत्न कोणत्या प्रकारचे होते याची कल्पना येऊ शकेल.

डॉ. जॉन मॅकलेनन हे मुंबई येथे असिस्टंट सर्जन व नेटिव्ह स्कूलचे सुपरिंटेंडंट होते. डॉ. मॅकलेनन यांच्या प्रयत्नांनी १८२६ मध्ये 'मेडिकल स्कूल फॉर द इन्स्ट्रक्शन ऑफ द नेटिव्ह प्रॅक्टिशनर्स' ही संस्था सुरू झाली. शिल्पशाळेमुळे ज्याप्रमाणे गणितावरील पुस्तके रचली गेली तद्वत मेडिकल स्कूलच्या स्थापनेमुळे वैद्यकावरील पुस्तके रचली गेली. मातृभाषेत लिहिलेल्या वैद्यक शास्त्रावरील पुस्तकाची वाण असल्यामुळे डॉ. मॅकलेनन यांनी १८२८ साली 'औषधकल्पनाविधि' हा ग्रंथ रचला. सामान्य लोकांना या विषयाचे ज्ञान व्हावे हा हेतूही लेखनाच्या मुळाशी होता. त्यांच्या 'शारीर' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत त्यांच्या प्रस्तुत हेतूचे सूचक असे उद्गार आहेत.[3] "ही विद्या फार मोठ्ये कामाची आहे. प्राण कशाने राहातो, मनुष्ये आणि जनावेरे कशाने चालतात, पाहातात, ऐकतात व इतर हे या विद्येवरून मनुष्यास ठाऊक होते. व सुप्रकृति ठेवणे, रोग न येऊ देणे, रोगाचे ठिकाण

---

१. भा. इ. सं. मं. शके १८३४, षण्मासिक वृत्त–पृष्ठ १३१.

२. अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका, ले. प्रा. गं. बा. सरदार, आवृत्ति दुसरी, १९५६, पृष्ठे २०६–२०७.

३. शारीर, जॉन मॅकलेनन– १९५२ पृ. १.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जाणणे व झालेला रोग दूर करणेही या विद्येने ठाऊक होते. या विद्येवाचून कोण कशाचे दमन करील. " या ग्रंथातही वायूची नावे इंग्रजी आहेत. नलक, कपाल, वलय, रुचक, अर्धचंद्रास्थि, सीमंतास्थि, रीढक, स्थिरसंधि, चलसंधि या सारखे मराठी प्रतिशब्द बनविण्याचाही प्रयत्न यात केला आहे. शरिरातील निरनिराळ्या प्रक्रिया व द्रवपदार्थ यास मूळचे इंग्रजी शब्द कायम ठेवले आहेत. १८५२ मधील 'निदान' या मध्येही काही रोगास मूळ इंग्रजी शब्द तसेच कायम ठेवले आहेत, परंतु बहुतेक ठिकाणी संस्कृत अथवा सोपे मराठी शब्द बनविण्याचाही प्रयत्न केला आहे.

## रोगांची नावे

**रक्तवाहिनी संबंधी-** अवघातादि, सहजविकार, रसविकार वगैरे.

**मज्जासंबंधी-** इंद्रियभेदक, बुद्धिभेदक.

| | | |
|---|---|---|
| इन्टरमिटंट | – | अंतरितज्वर (अंतराने येणारा) |
| रीमिटंट | – | निरंतर |
| आब्सेस | – | विद्रधि |
| इन्फ्लमेशन | – | दाह |
| न्युमोन्या | – | फुप्फुसदाह |
| चिक्केन्योक्स | – | कांजण्या |
| प्लीथोरा | – | अतिरिक्त |
| टूमर | – | वाळूक |
| अस्थमा | – | अंतरितज्वर. |

'एरिसिपेलस' अशी एखादी मूळ संज्ञाही कायम ठेवली आहे.

नारायण दाजी यांचा औषधिविद्या हा ग्रंथ १८६५ साली लिहिला गेला. हे ग्रॅन्ट मेडिकल कॉलेजातील औषधिविद्या व रसायनशास्त्र या विषयाचे प्राध्यापक होते.[१] त्यांनी आपल्या प्रस्तुत ग्रंथात तेथील विद्यार्थ्यांच्या उपयोगार्थ तो रचिला असे म्हटले आहे. यात शास्त्रीय विवरणावर बराच भर दिला आहे. काही ठिकाणी अत्यंत सुटसुटीत शब्द बनविले आहेत. औषधी संज्ञा व कृति यांच्या संज्ञा लॅटीन व इंग्रजीच कायम ठेविल्या आहेत. औषधिकृतीतील पारिभाषिक शब्दांचे काही नमुने खाली दिले आहेत–

| | | |
|---|---|---|
| क्रियाकलाप | – | Operations of Pharmacy |
| औषधक्रियाविधि | – | Pharmacutical Operations |
| चिकित्सालेखन | – | Prescription |
| औषधमेलनकर्ता | – | Compounder |
| औषधी योजना | – | Therapeutic |
| अनुमत औषधीयकल्प | – | Official Preparation |

इंग्रजी– फार्माकोपिया, ब्लीस्तर, परकोलेशन इत्यादी वैद्यक शास्त्रातील परिभाषा बनविणे सुलभ झाले ते आयुर्वेदातील व वैद्यकविषयक जुन्या विचारसामग्रीमुळे होय. पाश्चात्त्य वैद्यकामध्ये जे नवे प्रयोगसिद्ध असे ज्ञान होते त्याची परिभाषा बनविताना मात्र नवे मराठी शब्द संस्कृतच्या आधारे बनवावे लागले किंवा अशक्य तेथे इंग्रजी अथवा लॅटीन शब्द जसेच्या तसे कायम ठेवावे लागले.

मटेरिया मेडिका (Materia Medica) यास 'औषधीविद्या' असा सुलभ शब्द नारायण दाजी यांनी वापरला आहे. या विषयावरील शास्त्रीय परिभाषानिर्मितीचा प्रश्न आजही मराठीमध्ये या विषयावर लिहिणारास मार्गदर्शक ठरणारा आहे.

## भूगोल व खगोल

या विषयावरही १८३२ सालापासून काही पुस्तके आढळतात, पैकी बाळशास्त्री जांभेकर यांचे 'भूगोल आणि खगोल इत्यादि विषयक संवाद' हे पुस्तक १८३२ सालचे होय. यांनी 'भूगोलविद्या (१८३६), आणि' भूगोलशास्त्र–गणितभाग (१८३६) हीही पुस्तके लिहिलेली आहेत.

'भूगोलखगोल' (१८४१) हे पुस्तक महादेवशास्त्री पुराणिक यांनी लिहिले. याचे मूळनाव भूगोलखगोल म्हणजे भूगोलविद्येची व खगोलविद्येची मूलतत्त्वे.

मेजर कॅन्डी यांनीही भूगोल विषयक पुस्तके स्वतः लिहिली आहेत, व तत्कालीन पंडितांकडूनही लिहून घेतली. १८६० साली मेजर कॅन्डी यांचे 'हिंदुस्थानचे वर्णन' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. १८६३ साली 'भूगोलाचे

१. अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका, – गं. बा. सरदार, पृ. २२०.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वर्णन भाग १' हे प्रसिद्ध झाले. भूगोल-खगोलाचा अभ्यास शास्त्रशुद्धरीतीने व्हावा म्हणून त्यांनी महादेवशास्त्री पुराणिक यांचेकडून 'Sulivan's Geography Generalized' या पुस्तकाचे भाषांतर १८५४ साली करविले.

प्रस्तुत ठिकाणी केवळ तत्कालीन साऱ्या प्रयत्नांचा विस्तृत निर्देश करण्यापेक्षा परिभाषेकडे अधिक लक्ष देण्याचे योजिले आहे. पुण्याच्या पाठशाळेमध्ये भाषांतरकार म्हणून काम करीत असता महादेवशास्त्री यांनी हे लिहिलेले आहे. भूगोलासारखा हा विषय भारताला संपूर्णपणे अपरिचित नव्हता. यातील प्रयोग-सिद्ध ज्ञानाची कल्पना मात्र नवी होती. प्रस्तुत ग्रंथातील परिभाषा संस्कृत व काही ठिकाणी मराठी अशी आहे. क्षेत्रफळ, परिणाम, गति, दिशा, कटिबंध, वृत्त यासारखे शब्द मेजर कॅन्डी यांनी 'भूगोलाचे वर्णन' या ग्रंथात वापरले आहेत. प्रारंभीची शास्त्रीय-विषयावरील अनेक पुस्तके संवादात्मक पद्धतीने लिहिलेली असत. यामुळे विषयाचे प्रतिपादन प्राथमिक विद्यार्थ्यांच्या दृष्टीने सुलभपणे होई. या काळातील शास्त्रीय ग्रंथांचा हा एक महत्त्वाचा विशेष होय.

'दिग्दर्शन' व 'ज्ञानदर्शन या नियतकालिका-तूनही या विषयावर लेखन झाले आहे. आणि या विषयासंबंधीची परिभाषा तयार करण्यात या दोहोंचेही महत्त्व मानले पाहिजे. परिभाषा बनविताना शास्त्रीय विषयात दोहोत बहुतेक ठिकाणी संस्कृतनिष्ठताच अधिक आढळते.

### ज्योतिष

ज्योतिषशास्त्रावरही या काळात अनेक ग्रंथ झाले. भास्कराचार्यांवरील एक निबंध, बाळशास्त्री यांच्या १८३२ साली प्रसिद्ध झालेल्या 'भूगोलखगोल इत्यादि-विषयक संवाद' या पुस्तकास जोडलेला आहे. फलज्योतिषाविषयी समाजात असलेली आस्था ही या ग्रंथनिर्मितची एक मुख्य प्रेरणा होती. शालेय अभ्यास-क्रमात याची योजना झाली हे त्याचे दुसरे कारण होय. १८३६ त सुबाजीबापू याचा 'सिद्धांतशिरोमणी प्रकाश' हा एक स्वतंत्र ग्रंथरचनेचा प्रयत्न होय. १८४८ साली जनार्दनशास्त्री क्रमवंत यानी संस्कृताधारे लिहिलेला 'ज्योतिषसार' हा ग्रंथ उपलब्ध आहे. त्यात सारे शब्द संस्कृतातूनच घेतलेले आहेत. १८५६ साली वा. कृ. गद्रे आणि कृष्णशास्त्री गोडबोले या दोहोनी मिळून 'ग्रहलाघव'[१] या गणेश दैवज्ञांच्या ग्रंथाचे भाषातर केले. वा. कृ. गद्रे यांनी 'पंचांगसाधनसार' हे पुस्तक १८७० मध्ये प्रसिद्ध केले. त्या कालातील एक व्युत्पन्न पंडित परशुरामशास्त्री गोडबोले यांनी १८६३ मध्ये 'पंचांग-साधन' हे पुस्तक लिहिले. याखेरीज केरो लक्ष्मण छत्रे यांनी १८६० साली 'ग्रहसाधनाची कोष्टके' हा ग्रंथ फ्रेंच व इंग्लिश ज्योतिषाच्या आधारे केला. कृष्णशास्त्री गोडबोले म्हणतात,[२] "हा ग्रंथ १८०८ मध्ये आर. एस. व्हीन्स याने लिहिलेल्या ग्रंथाधारे तयार केला. त्यांत सूर्यसिद्धांतातील वर्तमान घेतले आहे आणि ग्रहस्थिती साधन घेतल्या आहेत. तिथि-साधनाचा आणखी एक ग्रंथ त्यांनी तिथिचिंतामणी-वरून तयार केला आहे. वरील दोन्ही ग्रंथ अत्यंत दुर्मिळ आहेत. केरो लक्ष्मण छत्रे हे उत्तम गणित, ज्योतिषज्ञ, सृष्टिशास्त्रज्ञ होते, पूना कॉलेजच्या मराठी व नॉर्मल स्कूलमध्ये सृष्टिशास्त्र व गणित हे विषय शिकविण्याकरता त्यांची नेमणूक झाली. ज्योतिषावर जी काही पुस्तके त्या काळात झाली त्यात केरो लक्ष्मण छत्रे यांचे पुस्तक विशेष उल्लेखनीय आहे. या ग्रंथा-प्रमाणे कृष्णशास्त्री भाटवडेकर यांचे 'आकाशसौंदर्य' (१८६१) हे खगोलविषयक पुस्तकही उल्लेखनीय आहे. हा विषय सुलभ व्हावा म्हणून, विशेषेकरून प्राकृतजनास व मुलास याचा बोध व्हावा म्हणून, त्यात सुलभ अशीच परिभाषा वापरली आहे आणि ग्रंथही सरळ भाषेत लिहिला आहे.

### अर्थशास्त्र

या विषयावर प्रारंभीच्या कालात १८७१ पर्यंत जवळजवळ आठ पुस्तके उपलब्ध आहेत. त्यातील १८४३ साली पहिले 'व्याज' हे बाळ रघुनाथ यांचे, १८४९ मध्ये 'लक्ष्मीज्ञान' – कामगार लोकांशी 'संभाषण' या ग्रंथाच्या कर्त्याने केले. लोकहितवादी यांचा हा ग्रंथ होय. १८५३ मध्ये नारो बाळकृष्ण पटवर्धन कृत 'संपत्तिविवेचन', १८५४ मध्ये 'देश-

१. अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका, ले. प्रा. गं. बा. सरदार, आवृत्ति १९५६, पृ. २१३,
२. ज्योतिःशास्त्र, कृष्णशास्त्री गोडबोले, (१८६२),



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्यवहार व्यवस्था ' हरि केशवजी पाठारे व विश्वनाथ नारायण मंडलीक; १८५५ मध्ये 'अर्थशास्त्र परिभाषा ' कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे. याखेरीज शंकरशास्त्री गोखले यांचे नांवावर १८५४ मध्ये 'व्यापारदर्पण ', व १८७१ मध्ये 'व्यवहारदर्पण' अशी पुस्तके उपलब्ध आहेत.

'लक्ष्मीज्ञान ' हे पुस्तक क्लीफ्ट यांच्या 'Political Economy ' या ग्रंथाच्या आधारे रचलेला आहे. तथापि ग्रंथकर्त्याने एतद्देशीय लोकांच्या बोधार्थ काही लिहिले आहे. याची ८७ पृष्ठें असून एकंदर ७ प्रकरणे आहेत त्यांची मांडणी अशी आहे :

प्रकरण १ – ज्ञानाविषयीं.
प्रकरण २ – मेहनतीचे विभाग.
प्रकरण ३ – क्रयविक्रय.
प्रकरण ४ – भांडवले.
प्रकरण ५ – निर्मिति.
प्रकरण ६ – किंमत.
प्रकरण ७ – धारानफा– हिंदुस्थानाविषयी विचार.

दुसरा उल्लेखनीय ग्रंथ म्हणजे 'देशव्यवहार-व्यवस्था ' हा होय. हरि केशवजी व विश्वनाथ नारायण मंडलीक यांनी " Mrs. Marcet's Conversation and Mill's Treatise on Political Economy " या ग्रंथाधारे केला. माहिती जुळविण्याचे काम मंडलीक व भाषा जुळविण्याचे काम हरि केशवजी यांनी केले. या दोहोंच्या कामावर ग्रीन नांवाच्या एका साहेबाची देखरेख होतीच. ग्रंथ तयार झाल्यावर त्याची तपासणी करण्यासाठी जाणता शास्त्रीवर्ग आणि इंग्रजी भाषेचे विद्यार्थी यांच्या समोर ग्रीन साहेबांच्या देखरेखीखाली तो वाचण्यात आला. पुण्याच्या विद्वन्मंडळाने संतोष प्रगट केल्यावर तो प्रसिद्ध करण्यात आला. या कामाबद्दल डेक्कन व्हर्न्याक्युलर टान्स्लेशन सोसायटीने हरि केशवजी यास रु. ९०० व विश्वनाथ नारायण मंडलीक यास रु. ३०० अशा देणग्या दिल्या. काही विभागाचे भाषांतर व काहींचे अनुकरण करून हा ग्रंथ तयार केला आहे. गुरु–शिष्यसंवादरूप अशा पद्धतीने विवेचन केल्यामुळे भाषेत सुबोधता आली आहे. एकंदर बावीस संवाद यात आहेत. हा विषय रोजच्या व्यवहाराशी निकट असल्यामुळे इंग्रजीतील परिभाषा कायम ठेवण्याची गरज यात निर्माण झाली नाही. या विषयाचे विवेचन हरि केशवजी पाठारे यांनी अत्यंत सुलभतेने केलेले आहे.

कृष्णशास्त्री चिपळूणकर हे अव्वल इंग्रजीतील एक व्युत्पन्न लेखक असल्याचे मराठी वाचकांस विदित आहे. त्यांचा 'अर्थशास्त्र परिभाषा ' हा ग्रंथ–शास्त्रीय ग्रंथ-लेखनाच्या परंपरेत विशेष उल्लेखनीय आहे. संस्कृत आणि इंग्रजी दोन्ही भाषांचे गाढ ज्ञान असल्यामुळे त्यांच्या लेखनात विषयविवेचन व शैली या दोन्ही बाबतीतील प्रभुत्व आले आहे. व्यवहारात ग्रंथ अधिक उपयुक्त व्हावा यासाठी देशातील व्यापार, शेतकी, राज्यव्यवस्था इत्यादींच्या ज्ञानाची जरूर होती व त्या बाबतीत आपण अनधिकारी असल्याचे लेखकाने मान्य केले आहे. परंतु विषयाचे विवेचन करण्यात बिलकूल न्यूनता नाही हे लेखकाने स्वतः देखील मान्य केले आहे. वरील सर्व अर्थशास्त्रविषयक ग्रंथातील परिभाषा कोठेही बोजड नाही. विषयाचे प्रतिपादन देखील सुलभरीतीने केलेले आहे.

## संकीर्ण लेखन

या विषयाखेरीज इतर अनेकविध विषयावर या काळात ग्रंथरचना झाली. यंत्रविद्या, शिल्पशास्त्र, प्राणिशास्त्र, सृष्टिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, शेतकी–बागाईत, तर्कशास्त्र, इत्यादि अनेक विषयांचा यात अंतर्भाव होतो.

'शिल्पविद्या या विषयाचे निबंध ' हे वुइल्यम हेन्री बेल यांचे पुस्तक १८३५ सालचे होय. यातील परिभाषेचे काही नमुने उल्लेखनीय आहेत.

निबंध ३ रा यातील काही नमुने–घर्षण, दोरीची अनम्रता, मळसूत्र, कपी, आस, भुज असे सोपे शब्द आहेत. तद्वत भारचेपण, स्थितिस्थापकत्व, शिल्पविद्या, साधनशक्ति, कार्यस्थल यासारखे संस्कृत शब्दही बरेच आहेत.

संकीर्ण ग्रंथात बाळशास्त्री जांभेकर यांचा १८३१ मधील 'सारसंग्रह ', १८५६ मधील सखाराम रामचंद्र दीक्षित यांचे 'शास्त्रीय ज्ञानदर्शन ', कृष्णशास्त्री भाटवडेकर यांचे १८५४ सालचे 'लोखंडी रस्त्याचे वर्णन ' व १८५९ सालचे 'वर्तमानवाहक विद्युत यंत्र', कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचा 'अनेक विद्या मूलतत्त्व संग्रह ' इत्यादि ग्रंथांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परिभाषेची निर्मिती व विषयप्रतिपादन या बाबतीत या लेखकांची कामगिरी मोलाची आहे. यांच्या प्रमाणे गोविंद नारायण माडगावकर यांचेही अनेक शास्त्रीय विषयावरील ग्रंथ शास्त्रीय वाङ्‌मयाचा विकास व परिभाषा या दृष्टीने अभ्यसनीय आहेत. 'सृष्टीतील चमत्कार (१८५३), 'उद्‌भिज्जन्य पदार्थ' (१८५६), 'वृक्षवर्णन' (१८५७), इत्यादी.

प्रस्तुत ग्रंथकारांपैकी एकेक ग्रंथकारही स्वतंत्रपणे त्याच्या एकंदर ग्रंथांचा अभ्यास व्हावा, त्या त्या काळातील कामगिरीचे मूल्यमापन व्हावे, सूक्ष्मपणे त्यावर वेगवेगळ्या दृष्टीने विवेचन करावे अशा तोलाचा आहे.

'लोखंडी रस्त्याचे वर्णन' व 'वर्तमानवाहक विद्युत यंत्र' ही दोन्ही पुस्तके भौतिक ज्ञान सामान्य लोकांना अधिक व्हावे या उद्देशाने लिहिली आहेत. त्या संबंधीचे फायदे-तोटे सांगून विषयाचे विस्तृत वर्णन दोन्ही ग्रंथात लेखकाने केलेले आहे. 'वर्तमानवाहक विद्युत यंत्र' हा ग्रंथ परिभाषा व विवेचन या दृष्टीने उल्लेखनीय आहे. प्रस्तुत पुस्तक इंग्रजी ग्रंथांच्या आधारे रचलेले आहे. पूर्वीच्या वर्तमानवाहनाची पद्धती, वीज कशी उत्पन्न होऊ शकते, यंत्रास कोणती कोणती वीज उपयोगी, पाश्चात्त्य विद्युत्संशोधकांची माहिती, इत्यादी गोष्टींविषयी सुबोध माहिती दिली आहे.

### परिभाषा

धन–Positive

ऋण–Negative

प्रस्तुत ग्रंथात यंत्रासंबंधी लोकविलक्षण कल्पनांचा उल्लेख केला आहे. प्रस्तुत विषयासंबंधी देशातील ज्ञानाच्या बाल्यावस्थेचाही निर्देश लेखकाने केला आहे.

बाळशास्त्री जांभेकर यांचे 'सारसंग्रह' (१८३१), हे पुस्तक अनेक विद्यार्थ्यांना सुबोध व्हावे म्हणून लिहिलेले आहे. पुस्तकाची रचना अतिशय व्यवस्थित व नीटनेटकी केली आहे. पाठांतरास सुलभ होईल अशा रीतीने विद्या व शास्त्रे यांची व्यवस्था संक्षिप्त रूपाने देण्याचा प्रयत्न केला आहे. तेजसविद्या, दर्शनानुशासन, पार्थिवविद्या, शिक्षामाला, (अवयवित्व आणि महत्व यांचा विचार करणारे शास्त्र), असे काही उत्तम शब्द इंग्रजी पारिभाषिक शब्दांस प्रतिशब्द म्हणून बनविले आहेत. ते सूचक व अर्थवाहक आहेत.

निरनिराळ्या शास्त्रांचे संवादरूपाने वर्णन करणाऱ्या यावेळच्या अनेक ग्रंथात 'शास्त्रीय ज्ञानदर्शन' या ग्रंथाचे परिभाषेच्या बाबतीतील प्रयत्न उल्लेखनीय आहेत. प्रस्तुत ग्रंथ दक्षिणीभाषेत पुस्तके प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीमार्फत प्रकाशित झाला. सखाराम रामचंद्र दीक्षित यानी विष्णु अमृतराव यांच्या मदतीने १८५६ मध्ये हा लिहिला. हरि केशवजी व कृष्णशास्त्री भाटवडेकर यानी तपासल्यानंतर हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. सृष्टीतील साधारण चमत्कार व त्यांची भिन्नभिन्न कारणे यांचे प्रश्नोत्तररूपाने वर्णन केले आहे. दुर्बोध शब्द समजावे म्हणून शेवटी अप्रसिद्ध परिभाषा जोडलेली आहे. यात पुस्तकात वापरलेल्या कठीण मराठी शब्दांचे अर्थ दिलेले आहेत. उदाहरणार्थ--

कोशेटा – टरफल.
हेंदर – मळ
झबडी – कुंडी
धातुकामाचा – धातुमय.

सूच्यग्र, गमनमार्ग, प्रस्फुटता या सारख्या संस्कृत शब्दाची योजना मधूनमधून केली आहे.

ओझोन, लेडनपात्र, क्लारिक (उष्णतेचे कारण) अशा काही इंग्रजी मूळ शब्दाची योजना नवीन अर्थवाहक शब्द बनणे अशक्य वाटले त्या ठिकाणी केली आहे. 'अनेक-विद्या-मूलतत्त्व-संग्रह' हे पुस्तक १८६१ साली कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी लिहिले. इंग्रजीमध्ये 'एलिमेंटरी कोर्स ऑफ रीडींग' या नावाचे एक पुस्तक आहे. त्या नमुन्यावर 'अनेक-विद्या मूलतत्त्वसंग्रह' हा ग्रंथ रचला आहे. उपयुक्त व चमत्कारिक शास्त्राचे साधारण ज्ञान व्हावे हा ग्रंथकर्त्याचा उद्देश आहे. मराठीत अपरिचित विषयावर लिहिताना संस्कृत शब्द घालणे भाग आहे असा अनुभव ग्रंथकर्त्यांनी दिला आहे. संस्कृत ग्रंथाचे विस्तृत वाचन असूनही सोपे व सुटसुटीत निवेदन हा त्यांच्या भाषाशैलीचा विशेष आहे. यंत्रशास्त्र, रसायन, दर्शनानुशासन, ज्योतिष, प्राणिधर्मविषयक, शारीरिक इत्यादि पदार्थविज्ञानांच्या शाखेचे अति संक्षेपाने विवरण केले आहे. भौतिक विज्ञानाच्या









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रसाराने युरोपातील लौकिकव्यवहारात उत्पन्न झालेली सुव्यवस्था व प्रगती याची जाणीव तत्कालीन इंग्रजी शिक्षित विद्वानास झालेली आहे त्याप्रमाणे जुन्या पठडीतील विद्वानांसही झालेली आहे. पाश्चात्यांचे वैज्ञानिक सामर्थ्य हेच त्यांच्या राष्ट्रीय सामर्थ्याचे कारण आहे, याची जाणीव या पुस्तकाच्या प्रस्तावनेत व्यक्त झाली आहे.

प्रस्तुत ग्रंथातील विविध विषयावरील विवेचन पाहिले म्हणजे शास्त्रीय विषयाव्यतिरिक्त स्थलवर्णने, थोर व्यक्तींची चरित्रे, या विषयांवरही ग्रंथलेखन करण्याइतका आत्मविश्वास त्या काळात कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या ग्रंथामुळे निर्माण झाला होता असे दिसते.

परिभाषेचा विचार करताना प्रस्तुत ठिकाणी काही प्रातिनिधिक ग्रंथांचाच तेवढा निर्देश केला आहे.

उपरीनिर्दिष्ट 'दिग्दर्शन' व 'ज्ञानदर्शन' या नियतकालिकांप्रमाणे १८४८ साली एलफिस्टन हायस्कूल मधील विद्यार्थ्यांनी स्थापन केलेल्या उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेच्या वतीने जे निबंध वाचले जात व व्याख्याने होत त्यांचा संग्रह करणारे 'मराठी ज्ञानप्रसारक' नावाचे जे मासिक चालू होते त्यातही शास्त्रीय विषयावर उद्बोधक लेख आढळतात. रसायन, पदार्थविज्ञान इत्यादी शास्त्रासंबंधी अनेक लेख यात आहेत. परिभाषेसंबंधीचे धोरण सामान्यतः असे आहे. — विशिष्ट संज्ञा इंग्रजीतील मूळ कायम ठेवून सामान्य परिभाषा तयार करण्यासाठी संस्कृताचा आधार घेतला आहे. उदाहरणार्थ, — घर्षण, वजन, रासायनिक कृती, इत्यादी. मराठी भाषेच्या लेखनासंबंधीचा, तत्संबंधी शुद्धाशुद्ध ठरविण्याचा अधिकार आपला आहे असा वाजवी अभिमान तत्कालीन काही पंडितांच्या ठिकाणी होता. शाळाखात्याचे मुख्य हॉवर्डसाहेब यांनी शालोपयोगी मराठी पुस्तके तयार करण्याकरिता आणि बेकनकृत 'नोव्हेम ऑर्गेनम्' नामक शास्त्रीय ग्रंथाचे मराठी भाषांतर करण्याकरिता भाऊ महाजन यांस सूचना केली होती. परंतु ही सूचना करताना ज्या विशिष्ट मर्यादा घालून दिल्या होत्या त्याबद्दल भाऊ महाजनांचे म्हणणे असे की, मराठी आमची मायभाषा असताना इजमध्ये अमुक रीतीने लिहा, अमूक रीतीने लिहू नका, असे सांगण्याचा अधिकार मराठी विद्वानांचा आहे. त्यातील शुद्धाशुद्धता आम्हास ठाऊक आहे, त्यात कोणीही ढवळाढवळ करू नये. शुद्धीकरता आमचे लेख मेजर कॅन्डीसाहेबाकडे पाठवू नयेत. हे म्हणणे हॉवर्ड साहेबास मान्य झाले नाही; आणि वरील ग्रंथाचे भाषांतर होऊ शकले नाही. पाश्चात्य विद्येच्या अनुरोधाने नवी विज्ञानपरंपरा आपणाकडे आलेली असली, तथापि, एतद्देशीय विद्वानामध्ये त्या काळातही स्वाभिमान, स्वयंप्रज्ञा यांचा विकास होऊ लागल्याचे दिसते, मराठी भाषेत कोणताही विषय आपणास उत्तम रीतीने लिहिता येईल असा आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणी निर्माण झाला होता असे यावरून निश्चित म्हणता येते.

शालेय पुस्तके छापण्याची सरकारी परवानगी मिळाल्यानंतर मुंबईच्या नेटिव्ह स्कूल बुक सोसायटीने पुस्तके निर्माण करण्यासाठी पुढाकार घेतला; यावेळी ग्रंथरचनेच्या आपल्या अटींसंबंधीचे एक प्रसिद्धीपत्रक मंडळाने प्रसिद्ध केले. त्यात कोणकोणत्या विषयासंबंधी पुस्तके प्रसिद्ध करावयाची त्याची भाषासरणी कशी असावी इत्यादी महत्त्वाच्या गोष्टींचा नामनिर्देश आढळतो. त्यातील भाषेसंबंधीचा निर्देश प्रस्तुत ठिकाणी महत्त्वाचा आहे. तो असा— " जी देशभाषा सर्व लोक समजतात ती ग्रंथास द्यावी. प्रौढ भाषेचे शब्द घालून याहून अवघड करू नये. आणि जर त्या भाषेत हवेत तसे शब्द मिळत नाहीत तर ते त्यांच्या मूळ भाषेतून घ्यावे. ते असे की, मराठी व गुजराथी यांस संस्कृतातून, हिंदुस्थानीतून, फारशी भाषेतून एकंदर प्रत्येकी मूळ भाषेचे साहाय्य घ्यावे. "— शास्त्रीय विषयांवरील पुस्तके सामान्य लोकांना सुलभ व्हावीत अशा हेतूने प्रस्तुत सूचना दिलेली दिसते. तदनुरूप शास्त्रीय विषयावरील पुस्तके लिहिताना शक्य तेवढे सुलभ प्रतिपादन व्हावे याकडे लेखकांचे विशेष लक्ष असे, असे तत्कालीन शास्त्रीय विषयावरील ग्रंथातील परिभाषेवरून दिसून येते.

## शास्त्रीय विषयांवरील ग्रंथनिर्मिती व परिभाषेसंबंधी धोरणाचे सामान्य स्वरूप

मराठीमध्ये प्रथमतः शास्त्रीय विषयावर ग्रंथरचना झाली ती शालोपयोगार्थ होय. पुढे त्यांतून निर्माण झालेली कुतूहलवृत्ती जागृत ठेवण्याच्या निमित्ताने



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रौढ वाचकांकरता म्हणूनही काही पुस्तके लिहिण्यात आली. परिभाषा तयार नाहीं म्हणून त्या विषयावर ग्रंथरचना होणे कठीण अशा तऱ्हेची अडचण तत्कालीन लेखकांपुढे उभी राहिली नाही. निरनिराळ्या शास्त्रात द्रव्ये, त्यांचे गुणधर्म, घटक, परिमाण क्रिया इत्यादी संबंधाच्या दर्शक संज्ञा मराठीतून निवडल्या आहेत. अथवा संस्कृतातून तयार केल्या आहेत. रसायनशास्त्रात धातु, वायु; वैद्यकशास्त्रात औषधांची नावे व रोगांची नावे; पदार्थविज्ञानात नव्या संशोधनाने आढळलेल्या नव्या वस्तू, शक्ती इत्यादिकांची नावे मूळ लॅटिन अथवा इंग्रजीच कायम ठेविली आहेत. जेथे जेथे आवश्यक वाटले तेथे तेथे मराठी व संस्कृताच्या आधारे नवे शब्द बनविले आहेत. व ते सुटसुटीत व अर्थवाहक होतील याकडे लक्ष पुरविले आहे. परकीय भाषेतून आलेले नवे ज्ञान-भांडार केवळ मराठी भाषेत तत्संबंधीच्या सूचक संज्ञा नाहीत, म्हणून तत्कालीन विद्वानांनी दूर लोटले नाही. परिभाषेच्या योजनेबाबत निश्चित धोरण कोणते असावे यासंबंधी तत्कालीन अनेक विद्वानांनीही आपापले विचार प्रगट केले आहेत. शाळाखात्याने वेळोवेळी या संबंधातील धोरण निश्चित केलेले आहे. डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन हावर्ड, मेजर कॅन्डी, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादिकांनी या संबंधाचे धोरण वेळोवेळी प्रगट केले आहे. मराठी प्रतिशब्द सुचविताना इंग्रजीतील मूळ संज्ञांचा आशय स्पष्टपणे दिलेला असावा व त्या संज्ञाही तेथे उद्धृत कराव्यात, म्हणजे एकाच शब्दाला निरनिराळ्या ग्रंथात दिलेल्या विविध प्रतिशब्दामुळे सामान्य वाचकांचा गोंधळ होणार नाही. निरनिराळ्या ग्रंथांची मराठीमध्ये भाषांतरे करीत असताना त्यातील जो भाग स्थानिक महत्त्वाचा तो गाळावा, मूळच्या स्वरूपात जो भाग एतद्देशीयांना समजू शकणार नाही त्याचे अधिक विशदीकरण करावे अशी सूचना कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी याबाबत केल्याचे आढळते.[1] प्रस्तुत सूचना कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी ते दक्षिणा प्राइझ कमिटीचे सेक्रेटरी व रिव्हायजर असतानाही केलेल्या होत्या. १८६२–६३ सालच्या दक्षिणा प्राइझ कमिटीच्या वार्षिक इतिवृत्तामध्ये या प्रश्नावर झालेल्या चर्चेचा सारांश आढळतो. त्यातही एकतर मूळ इंग्रजी संज्ञा जशाच्या तशा मराठीमध्ये आणणे अथवा संस्कृतच्या साहाय्याने प्रतिशब्द बनविणे असे दोनच मार्ग कमिटी समोर असलेले दिसतात. तत्कालीन लेखकांनीही या दोन्ही धोरणाचा अवलंब केल्याचे दिसते. हॉवर्डने व्यक्त केलेल्या या मुद्यावरील अभिप्रायात या संबंधात आणखी एक उल्लेखनीय विशेष आहे. ग्रंथकारांच्या विचारविनिमयासाठी योग्य वाटणाऱ्या पारिभाषिक संज्ञाची यादी वारंवार प्रसिद्ध करीत रहावे ही ती सूचना होय. मात्र ही सूचना प्रत्यक्षात अमलात आल्याचे दिसत नाही. १८७३ साली शालेय पुस्तकाच्या तपासणीसाठी एक उपसमिती नेमली होती.[2] तिने काही प्रादेशिक उपसमित्याही नेमल्या. त्यांतील मराठी भाषेतील पुस्तकांसंबंधी नेमलेल्या उपसमितीने पाश्चात्य शास्त्रीय विषयांवरील शब्द परभाषातून लिहावे असे धोरण स्वीकारले आहे. ही सूचना १८९१ साली इंदुप्रकाशाने ( पु. ३० अं. ४१ ) मान्य केल्याचे दिसते. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे या बाबतील मत मात्र वरील धोरणापेक्षा वेगळे आहे. संस्कृत भाषेच्या संपन्न शब्दसंपत्तीच्या आधारे परिभाषा बनविण्याचे काम सुलभ होऊ शकेल असे त्याचे म्हणणे आहे.

कोणत्याही भाषेतील ग्रंथसंपत्तीची वाढ होण्याच्या दृष्टीने निरनिराळ्या विषयावर स्वतंत्र व इतर भाषेतील ग्रंथाधारे निर्मिती होत राहिली पाहिजे. ग्रंथनिर्मिती सतत होत राहिली म्हणजे शास्त्रीय विषयावरील परिभाषेचा प्रश्न अधिकाधिक उलगडू लागेल. प्रारंभीच्या मराठी साहित्याचे अवलोकन केले म्हणजे लिहिता लिहिताच परिभाषा कशी सरावली याचा अंदाज घेता येतो. वैद्यक, रसायन, पदार्थविज्ञान इत्यादी शास्त्रातील प्रयोगसिद्ध संशोधनाने प्रत्ययास आलेले नवे पर्याय - उदाहरणार्थ, वैद्यकातील शरीरांतर्गत अनेक विभाग, पदार्थविज्ञान व रसायनातील विविध द्रव्ये व गुणधर्म यासाठी इंग्रजीतील मूळ परिभाषाच कायम ठेवावी लागली. परंतु शक्य तेथे संस्कृत व मराठीच्या

१. अर्वाचीन मराठी गद्याची उत्क्रांति, लेखक डॉ. कृ. भि. कुळकर्णी, पृ. २६७–२६९.
२. अर्वाचीन मराठी गद्याची उत्क्रांति, लेखक डॉ. कृ. भि. कुळकर्णी, पृ. २७०.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आधारे नवे पर्याय शब्दही तत्कालीन ग्रंथकारांनी वापरलेले दिसतात.

## शिक्षणाचे माध्यम व शास्त्रीय विषयावरील ग्रंथनिर्मिती

देशी भाषा हेच शिक्षणाचे माध्यम म्हणून स्वीकारले तरच शास्त्रीय विषयावरील ग्रंथाची निपज अधिक प्रमाणात होऊ शकते, कारण शास्त्रीय विषयावरील वाचनाची अभिरूची सर्वसामान्य वाचकांमध्ये सामान्यतः फार कमी असते; यामुळे विद्यापीठातून देशभाषांना माध्यम म्हणून स्थान लाभल्यावाचून शास्त्रीय वाङ्मयाची निपज देशी भाषांमध्ये मोठ्या प्रमाणात होत नाही, असे म्हटल्यास ते चुकीचे ठरण्याचा संभव नाही.

शिक्षणाचे माध्यम कोणते असावे हा प्रश्न शिक्षणाचे साधन म्हणून मराठी भाषेमध्ये पुस्तके तयार होऊ लागली त्यावेळी निर्माण झाला नव्हता. वस्तुतः १८४२ मध्ये टॉमस अर्स्किन पेरी हे बोर्ड ऑफ एज्युकेशन या संस्थेचे अध्यक्ष झाल्यावरच माध्यमाचा प्रश्न तीव्रपणे जाणवू लागला. नंतर त्याचा निष्कर्ष माध्यम इंग्रजी असावे असा करण्यात आला. याचा एक परिणाम असा दिसू लागतो की प्रारंभीच्या पन्नास वर्षांपेक्षा नंतरच्या कालात शास्त्रीय विषयावरील ग्रंथसंख्या बरीच घटलेली दिसते. १८७० साली मराठीला अर्धचंद्र मिळाल्यानंतर दहा वर्षांनंतर १८८० साली सरकारी शाळाखात्याने 'अनेकविद्याविषयक ग्रंथमाले' सारख्या मालांतून निरनिराळ्या विद्वानांच्याकरवी शास्त्रीय विषयावर ग्रंथ लिहवून घेतले. या मालेत बाळाजी प्रभाकर मोडक, श्रीयुत नगरकर, श्रीयुत गोळे, श्री. का. बा. मराठे या लेखकांनी भौतिक शास्त्रांपैकी सृष्टिज्ञान, रसायन, भूवर्णन, वनस्पतिशास्त्र अशा अनेक विषयावर ग्रंथ लिहिले. या काळामधील शास्त्रीय विषयावरील ग्रंथात जी परिभाषा स्वीकारली आहे तिच्या घडणीत प्रारंभीच्या काळातील प्रयत्नांचा उपयोग बऱ्याच प्रमाणात करून घेतल्याचे आढळते. यापुढील काळातील शास्त्रीय वाङ्मय हे एक अत्यंत विस्तृत असे अभ्यासाचे क्षेत्र आहे. त्याचा विचार प्रस्तुत लेखाच्या कक्षेत होणे अशक्य आहे. प्रस्तुत विषयाचा समारोप करण्यापूर्वी एका महत्वाच्या गोष्टीचा निर्देश येथे अवश्य करावयास पाहिजे. बाळाजी प्रभाकर मोडक या शास्त्रीय विषयात ग्रंथलेखन करणाऱ्या एका लेखकाने निरनिराळ्या शास्त्रात जाणीवपूर्वक नवी परिभाषा निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या ग्रंथातून व केव्हा त्यातील प्रस्तावनेतून मराठीत शास्त्रीय ग्रंथनिर्मितीची आवश्यकता, त्यात जाणवणाऱ्या अडचणी, त्यांचे अंशतः निरसन कसे करावे या संबंधी मार्गदर्शक ठरणारे उद्‍गार काढले आहेत. त्यामध्ये मराठीत उत्तरोत्तर शास्त्रीय ग्रंथनिर्मिती घटण्याचे कारणही दिग्दर्शित केले आहे.

युनिव्हर्सिटीच्या स्थापनेपूर्वीच्या दोन पिढ्यांचे लेखन १८६७ पर्यंतच्या कालात समाविष्ट होऊ शकते. यापैकी जॉर्ज जर्व्हिस, बाळशास्त्री जांभेकर, हरि केशवजी, डॉ. जॉन मॅकलेनन ही पहिली पिढी, तर कृष्णशास्त्री चिपळूणकर, महादेवशास्त्री पुराणिक, केरो लक्ष्मण छत्रे, नारायण दाजी, गोविंद नारायण ही दुसरी पिढी होय. शास्त्रीय विषयावर लेखन करणाऱ्या ग्रंथकारांमध्ये शिक्षक पेशाच्या व्यक्ती या काळात अधिक आढळतात, तर इतर कित्येक सरकारी कचेरीत काम करणाऱ्या अथवा सरकारी खात्याशी संबंधित असलेल्या अथवा भाषांतरकार म्हणून मेजर कॅन्डी यांनी नेमलेल्या अशा व्यक्तीही आहेत.

अर्वाचीन ब्रिटिश राजवटीत वावरणाऱ्या शास्त्रीवर्गावर पौर्वात्य व पाश्चिमात्य या दोन्ही विद्येचे संस्कार झाले होते. यामुळे शास्त्रीय परिभाषा घडवीत असताना त्यांना संस्कृत व इंग्रजी या दोन्ही भाषांचे साहाय्य झाले. कृष्णशास्त्री चिपळूणकर, महादेवशास्त्री पुराणिक इत्यादी लेखकांच्या लेखनात हे संस्कार स्पष्टपणे प्रगट झाले आहेत. पुणे येथील पाठशाळेत भाषांतरकार तयार करण्याचे वर्गही मेजर कॅन्डी यांच्या देखरेखीखाली चालू होते. यामधून 'ट्रान्सलेशन एक्झिबिशनर्स' नेमून त्यांच्याकरवी उपयुक्त इंग्रजी पुस्तकांची भाषांतरे करविण्याचे काम चालू होते. परीक्षार्थी भाषांतरकारांची निवड परीक्षा घेऊन केली जाई. मराठी, संस्कृत व इंग्रजी या तीनही भाषांचे ज्ञान भाषांतरकार म्हणून परीक्षा देऊ इच्छिणारांना असावे अशी स्पष्ट विचारसरणी या पाठीमागे असल्याचे



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आढळते. पारिभाषिक शब्दांची निर्मिती निरनिराळ्या देशी भाषातून व्हावी यासाठी मूळ इंग्रजीतील संज्ञेने नेमके काय अभिप्रेत होते हे लक्षात आले पाहिजे; मग स्वभाषेमध्ये त्याचा तर्जुमा उतरविता येईल, मराठीमध्ये कोणत्याही शास्त्रातील पारिभाषिक शब्द बनविताना ते शब्द बनविणारांना संस्कृत भाषेचे ज्ञान अवश्य आहे, प्रारंभीच्या काळातील अनेक ग्रंथकारांच्या ठिकाणी या भाषेचे प्रभुत्व असल्याचे लक्षात येते.

शालेय गरजेतून निर्माण झालेल्या प्रयत्नाचे महत्व उत्तरकालीनांच्या लक्षात पूर्णपणे आल्याची साक्ष बाळाजी प्रभाकर मोडक यांनी केलेल्या ग्रंथनिर्मितीतून व त्यातील उद्गारातून पटते. बाळाजी प्रभाकर मोडक यांचे शास्त्रीय विषयावरील लेखन कोल्हापुरास राजकुमारांना शास्त्रीयविषयाचे शिक्षण मराठीतून देत असताना झालेले आहे. १८९५ नंतर दाभोळकर ग्रंथमालेसारख्या काही ग्रंथमालांनी शास्त्रीय वाङ्मयनिर्मितीच्या बाबतीत केलेल्या प्रयत्नांपेक्षा त्यापूर्वीचे प्रयत्न विषयनिवेदनाच्या व्यापकतेच्या दृष्टीने प्राथमिक स्वरूपाचे वाटले. तथापि परिभाषानिर्मितीच्या बाबतीत हे ग्रंथ आजही मार्गदर्शक ठरणारे आहेत.

विद्यार्थीदशेनंतर त्या त्या शास्त्रीय विषयासंबंधीचे कुतूहल जागृत राहील अशा स्वरूपाची पुस्तके मराठीत त्यावेळी म्हणजे १८८० च्या आसपास प्रारंभी झाली त्यापेक्षा पुन्हा अधिक प्रमाणात निर्माण होत नव्हती. प्राथमिक शाळेत मराठीमध्ये शिक्षण घेतल्यानंतर पुढे इंग्रजीतून अध्ययन करण्याचा प्रसंग आला म्हणजे त्या भाषेवर प्रभुत्व येताचे असल्याने तेही ग्रंथ वाचले जात नाहीत; शिवाय परकी भाषेतून साऱ्या विषयांचा अभ्यास करावयाचा म्हणजे विद्यार्थ्यांवर बोजाही अधिक पडावयाचा, जनतेची या विषयासंबंधातील अभिरुची कायम रहावी, शास्त्रीय विषयाच्या अध्ययनाकडे दुर्लक्ष होऊ नये; देशात भौतिक ज्ञानाचा अधिकाधिक प्रसार व्हावा या हेतूने बाळाजी प्रभाकर मोडक यानी ग्रंथरचना केली. १८६७ सालानंतरच्या प्रयत्नात त्यांचे शास्त्रीय ग्रंथलेखनाचे प्रयत्न, परिभाषा आणि विषयनिवेदन या दृष्टीने महत्त्वाचे आहेत.

परिभाषेसंबंधी बा. प्र. मोडक यानी आपला जो अनुभव निवेदन केला आहे तो मराठी भाषेत शास्त्रीय विषयावर ग्रंथरचना करणारास आजही मार्गदर्शक ठरणार आहे. या दृष्टीने त्याचा उल्लेख येथे करणे अप्रशस्त ठरणार नाही.

मराठीत शास्त्रीय विषयावर लिहिताना पारिभाषिक शब्दासंबंधी अडचण भासते. यामुळे कित्येक ठिकाणी मूळचे इंग्रजी शब्द कायम ठेवावे लागतात असा अनुभव त्यांनी निवेदन केला आहे. रसायन, पदार्थविज्ञान इत्यादी हिंदुस्थानात फारशा प्रगल्भ न झालेल्या शास्त्रात ही अडचण तेव्हा अधिक भासे. देशात त्या त्या विषयांचा विचार व व्यवहार प्रसृत झाल्याखेरीज त्या संबंधीच्या संज्ञा निर्माण होणे शक्य नसते. अशा प्रकारची परिस्थिती बऱ्याच भौतिक विज्ञानांच्या बाबतीत आपणाकडे झाली. मातृभाषेतून अधिकाधिक ग्रंथरचना होईल तेव्हाच परिभाषेचा प्रश्न सुटेल, अशा आशयाचे उद्गार मोडक यानी आपल्या ग्रंथातून ठिकठिकाणी काढले आहेत. मराठीतील परिभाषेच्या निर्मितीला संस्कृत भाषा फार मोठ्या प्रमाणात साहाय्यक ठरते, हे लक्षात घेऊन तेव्हाच्या भाषांतर कर्त्यांना या भाषेचे ज्ञान असणे आवश्यक मानले जाई. परिभाषा निर्मितीच्या केवळ कृत्रिम प्रयत्नांनी कोणत्याही भाषेत शब्दसंपत्ती तयार होत नाही; ती परिभाषा रूढ व्हावी यासाठी त्या त्या भाषेत शास्त्रीय विषयावर ग्रंथरचना व्हावी लागते. विद्यापीठाच्या शिक्षणाचे माध्यम इंग्रजी झाल्याबरोबर मराठीतील शास्त्रीय विषयावरील ग्रंथरचना घटू लागली. अलीकडे काही वर्षे पुणे विद्यापीठाने मराठीत शास्त्रीय विषयावर ग्रंथनिर्मिती करविली. महाराष्ट्र साहित्य परिषदेनेही शास्त्रीय विषयावर परिभाषा निर्माण करण्याचा एक उपक्रम केला होता याचे एकीकरण ' शास्त्रीय परिभाषा कोश ' या ग्रंथरूपाने आता प्रकाशात आले आहे. शास्त्रीय विषयांची परिभाषा निर्माण करताना सुलभता, सूचकता, संक्षिप्तता, शब्दरचनेचा साक्षेप या गोष्टी विशेषत्वाने ध्यानात घ्याव्या लागतात; शास्त्रीय विषयांवर लिहिणारांना या क्षेत्रात मार्गदर्शक होतील अशा काही सूचना बाळाजी प्रभाकर मोडक यांनी आपल्या ' रसायनशास्त्र, उत्तरार्ध - भाग १ ' यातील प्रस्तावनेत दिल्या आहेत.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परिभाषा निर्मितीसंबंधाने बॉम्बे एज्युकेशन सोसायटीने प्रसिद्ध केलेल्या पत्रकात मराठी भाषेमध्ये परिभाषा तयार करताना संस्कृताचे साहाय्य घ्यावे अशी सूचना केली आहे. परिभाषेत अर्थक्षमता आणि आटोपशीरपणा यावा यासाठी सूचना वेळोवेळी पोषक ठरली असे अर्वाचीन मराठीतील प्रारंभीच्या सुमारे पन्नास वर्षातील ग्रंथनिर्मितीवरून दिसून येते.

१८४९ साली एल्फिन्स्टन हायस्कूलमधील विद्यार्थ्यांनी स्थापन केलेल्या मराठी ज्ञानप्रसारक सभेच्या वतीने जे निबंध वाचले जात त्यांचा संग्रह करणारे 'मराठी ज्ञानप्रसारक' या नावाचे जे मासिक निघत असे त्यात शास्त्रीय विषयावर उद्बोधक लेख आले आहेत आहेत याचा निर्देश पूर्वार्धात केला आहे. या ज्ञानप्रसारकात इंग्रजी व मराठी माध्यमासंबंधी निबंधात इंग्रजीचे अनेक फायदे दिले आहेत. जे विचार आपल्या देशात मूलतः उत्पन्न झालेले नाहीत, ते प्रगट करण्यास कोणत्याही देशी भाषेस परभाषेचे साहाय्य घ्यावे लागते. मराठीसही शास्त्रीय परिभाषेकरिता इंग्रजीचे साहाय्य घ्यावे लागेल, व ते घ्यावे, असा एक विचारप्रवाह या माध्यमासंबंधीच्या चर्चेत आढळतो.[१] इंग्रजीची या व इतर दृष्टीने तरफदारी याच संदर्भात मराठी ज्ञानप्रसारकाने केली आहे.[२]

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निबंधमालेमध्ये 'भाषांतर' नामक निबंधात पारिभाषिक शब्द कसे तयार करावेत आणि ते कसे असावेत या संबंधीचे धोरण व्यक्त झालेले आहे भाषाशुद्धीच्या दृष्टीने परकीय शब्दांच्या नाण्याची टांकसाळ विष्णुशास्त्री यांना मराठीत येऊ द्यावयाची नव्हती, म्हणून शास्त्रीय संज्ञेस उद्बोधक संस्कृत संज्ञा तयार व्हाव्यात असे मत त्यांनी व्यक्त केले. परकीय शब्दांचा मराठीमध्ये होता होईल तो वापर न करण्याकडे शास्त्रीबुवांची प्रवृत्ती होती. परंतु शास्त्रीय परिभाषेच्या निर्मितीसंबंधात ते म्हणतात, 'विचाराबरोबर भाषा उत्पन्न होते, असे असले तरी मराठीस हे शब्द सहज निर्माण करता येत नाहीत' हेही त्यांना मान्य होते, परंतु याबाबतीत इंग्रजीची टांकसाळ कमी करावी, असा प्रभाव त्यांनी निर्माण केला.

शास्त्रीय परिभाषेची निर्मिती, त्यातील अडचणी, शास्त्रीय ग्रंथनिर्मितीच्या भरती-ओहोटीची मीमांसा या संबंधीचे उद्बोधक विचार बाळाजी प्रभाकर मोडक यांनी आपल्या विविध शास्त्रीय विषयांवरील ग्रंथनिर्मिती व शिक्षणाच्या माध्यमाचा प्रश्न या दोहोंचे संबंध अत्यंत घनिष्ठ स्वरूपाचे आहेत हे त्यांनी प्रथम स्पष्टपणे मांडले. स्वभाषा हे शिक्षणाचे माध्यम झाल्याखेरीज मराठीतील शास्त्रीय वाङ्मयाच्या निर्मितीला उजाळा मिळणार नाही अशा आशयाचे उद्गार त्यांनी काढले आहेत.

शास्त्रीय वाङ्मयाच्या या काळातील निर्मितीने जीवनातील नव्या मूल्यमापनास बराच मोठा हातभार लावला होता असे म्हणता येईल. ब्रिटिश राजवटीतील निरनिराळ्या संस्कारानी व साधनांनी तेव्हाच्या महाराष्ट्रात एक नवे मन्वंतर घडवून आणले, कायदा, न्याय, दळणवळणाची साधने या निरनिराळ्या साधनांनी येथे एका नव्या बुद्धिवादाचे बीज रोवले.

पौर्वात्यांच्या अध्यात्मप्रधान आणि ग्रंथप्रामाण्य मानणाऱ्या प्रवृत्तीचे मूळच या नव्या संस्कारांनी खिळखिळे केले. शास्त्रीय वाङ्मयाच्या निर्मितीने त्या काळात निर्माण होत असलेल्या वैचारिक स्थित्यंतरास हातभार लावला. यात शंका नाही. तत्कालीन नव्या शिक्षणपद्धतीने भौतिकज्ञानाचे लोण येथपर्यंत आणून पोहोचवले. जुन्या पारंपरिक समजुती, आंधळी धर्मश्रद्धा, रूढीग्रस्त विचारसरणी यांचे या नव्या सामाजिक परिवर्तनात निराकरण होऊ लागले होते. या विचार परिवर्तनास शास्त्रीय वाङ्मयाचे अप्रत्यक्ष साहाय्य झाले.

प्रथमतः शालेय शिक्षणाच्या गरजेतून निर्माण झालेल्या या ग्रंथनिर्मितीने प्रौढ अभिरुचीस प्रेरक असे वाङ्मयही पुढे निर्माण केले.

पाश्चात्त्य देशांच्या मानाने आपल्या देशात शास्त्रीय विज्ञानाचे कुतूहल बरेच कमी आढळते. याचे एक मुख्य कारण म्हणजे निरक्षर जनतेचे प्रमाण आपल्या येथे फार मोठे आहे; दुसरे महत्त्वाचे कारण म्हणजे देशी भाषेतील या विषयावरील ग्रंथांचा अभाव हे होय. शिवाय शिक्षित वर्गामध्ये विज्ञानाचे जे कुतूहल

१. मराठी ज्ञानप्रसारक पु. ३, अंक. १०, पृ. २९३.
२. मराठी ज्ञानप्रसारक पु. ३, अंक १० पृष्ठ ३०५–३११, ३२०.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आढळते ते तृप्त करणारे ग्रंथ इंग्रजी भाषेतून त्यांना उपलब्ध होऊ शकतात.

पाश्चात्त्य देशांपैकी अनेक देशांतील विद्यापीठातून शिक्षणाचे माध्यम देशी भाषा हेच असल्याचे आढळते. यामुळे त्या विषयावर देशी भाषांतून ग्रंथनिर्मिती होत असते. विद्यार्थ्यांची अभिरुची देखील या ग्रंथांमुळे आपोआप तयार होत जाते. विद्यार्थी आणि नागरिक यांच्या मागणीमुळे शास्त्रीय विषयावरील प्रौढ स्वरूपाची ग्रंथरचनाही अधिकाधिक होत जाते; या प्रकारच्या ग्रंथरचनेचे प्रमाण पाश्चात्त्य देशात फार मोठे आहे. येथील निरनिराळ्या देशीभाषेतून शास्त्रीय वाङ्मयाची निर्मिती कमी होण्याचे मुख्य कारण म्हणजे परकीय भाषेतून शिक्षणप्रसार हेच होय. विद्यार्थ्यांची अभिरुची तो विषय इंग्रजीतून वाचण्याच्या दृष्टीने तयार झालेली असे, यामुळे स्वभाषेतून लिहिलेल्या ग्रंथांस त्यांचेकडून मागणी नाही. प्रौढ जनता बहुजनसमाज शास्त्रीय वाङ्मय वाचण्याइतकी सुबुद्ध झालेली नाही, यामुळे कोणत्याही बाजूने शास्त्रीय वाङ्मयाची मागणी वाढण्यास अनुकूल वातावरण नाही.

देशीभाषा हे शिक्षणाचे माध्यम बनले तर शास्त्रीय विषय स्वभाषेतून वाचणारा विद्यार्थी वर्ग व उच्च ज्ञानाभिरुची आपोआप तयार होईल. स्वभाषेतून लिहिलेल्या शास्त्रीय वाङ्मयाचा वाचकवर्गही उत्तरोत्तर वाढत जाईल.

मुंबई विद्यापीठ स्थापन झाल्यानंतर विविध कलाप्रमाणे शास्त्रांचे अध्ययन व अध्यापन या दोहोस महत्त्व प्राप्त झाले, जेव्हा या विषयांचे अध्ययन व अध्यापन देशी भाषांतून होत असे, त्यावेळी विद्यार्थ्यांना मार्गदर्शक होतील अशा स्वरूपाची शास्त्रीय विषयावरील ग्रंथरचनाही झाली; पुढे देशीभाषा विरुद्ध परभाषा यांचे माध्यमाबाबत जे द्वंद्व झाले त्यात देशी भाषांची पीछेहाट झाली. उच्च शिक्षण इंग्रजीतून होऊ लागले. विद्यार्थ्यांकडूनही देशी भाषांतील ग्रंथांची मागणी मंदावली. त्यामुळे पहिल्या पन्नास वर्षांतील शास्त्रीय विषयांवरील ग्रंथाची संख्या घटली. १८८० नंतर शास्त्रीय विषयावर जी ग्रंथरचना झाली तिला पूर्वी इतके वाचक लाभले नाहीत.

गेल्या १०–२० वर्षांत महाराष्ट्र साहित्य परिषदेने वेळोवेळी अनेक शास्त्रांतील परिभाषा निर्माण करण्याचा प्रयत्न केला, व त्या सिद्धही केल्या आहेत. या निरनिराळ्या पुस्तिका आता 'शास्त्रीय परिभाषाकोश' या रूपाने प्रसिद्ध झाल्या आहेत. परंतु असे केवळ परिभाषा निर्मितीचे प्रयत्न होऊनही जो पर्यन्त ती परिभाषा ग्रंथांतून वेगवेगळ्या विषयांच्या विवरणात रुजत नाही, तोपर्यन्त तिचे अपरिचितत्व कायम राहणार, हे स्पष्ट आहे.

अलीकडच्या काळात महाराष्ट्र शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाने सर्व विद्यापीठाकरिता एकरूप अशी वैज्ञानिक व तांत्रिक शब्दावली तयार करण्याची एक योजना तयार केली आहे. या योजनेस अनुसरून काही विद्यापीठांनी परिभाषा निर्मितीचे प्रयत्न सुरू केले आहेत, असे दिसून येते. या कार्यासाठी महाराष्ट्र शासनाने नियुक्त केलेल्या समितीवर पुणे, मुंबई या विद्यापीठांनी आपापले प्रतिनिधी पाठविले आहेत. या कामाला प्रारंभ होण्यापूर्वी पुणे विद्यापीठाने स्वतंत्रपणे यासाठी एक समिती नेमून विविध शास्त्रीय विषयावर परिभाषा निर्माण करण्याचे प्रयत्न केले होते. त्यात गणितशास्त्र, रसायनशास्त्र तर्कशास्त्र, मानसशास्त्र इत्यादी अनेक शास्त्रांचा अंतर्भाव झाला आहे. आता महाराष्ट्र शासनाच्यातर्फे हे कार्य चालू असल्यामुळे पुणे विद्यापीठाने आपले कार्य स्थगित केले आहे.

शिक्षणाचे माध्यम मातृभाषा हे असावे असा विचार आता सर्वमान्य झाला आहे. परंतु अद्यापही शास्त्रीय विषयांवरील ग्रंथरचना मोठ्या प्रमाणात होऊ लागलेली नाही. उच्च शिक्षणात ज्या ज्या विद्यापीठात शास्त्रीय विषय मराठीतून शिकविण्याचा प्रश्न निर्माण होतो, तेथे परिभाषेची अडचण अजूनही भासते. परिभाषेच्या निर्मितीच्या आणि वापराच्या बाबतीत ऐक्य निर्माण करण्याचा प्रयत्न कसोशीने व्हावयाचा असेल, तर त्या त्या भाषेत शास्त्रीय विषयावर ग्रंथ-निर्मिती हाच एक महत्त्वाचा उपाय आहे.

युरोपातील शास्त्रीय वाङ्मयाच्या भरभराटीला शिक्षणाचे माध्यम तेथे स्वभाषा आहे, हेच मुख्य कारण होय. प्रायोगिक साधनांची संपन्नता, समृद्धी या गोष्टी पाश्चात्त्य देशातील शास्त्रीय विषयावरील









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ग्रंथनिर्मितीस साहाय्यक ठरल्या. ग्रंथरचनेची दीर्घ परंपरा तेथे निर्माण झाल्याने परिभाषेची अडचण आपोआप दूर झाली.

ब्रिटिश राजवटीच्या काळात ज्या विद्वानास आंतरराष्ट्रीय मान्यता मिळवावयाची ते लेखक आपले लेखन इंग्रजीतून करीत, जोपर्यंत देशीभाषांना विद्यापीठाच्या कक्षेत माध्यम म्हणून स्थान होते, तोपर्यंत शास्त्रीय विषयांवरील ग्रंथरचनेस जोरदार प्रेरणा मिळाली. पुढे हे प्रमाण घटले, या प्रयत्नांचे बीजही लोपले. स्वराज्यप्राप्तीनंतर पुनश्च माध्यमाच्या प्रश्नाला महत्त्व मिळाले. पुन्हा एकदा शास्त्रीय वाङ्मयाला पोषक ठरणारी पार्श्वभूमी निर्माण झाली.

१८२३ नंतरच्या काळात प्रारंभी विद्यार्थ्यास उपयुक्त असे शालेय स्वरूपाचे व नंतर प्रौढ अभिरुचीस पूरक असे शास्त्रीय विषयावरील वाङ्मय निपजले. 'दिग्दर्शन,' 'ज्ञानदर्शन' यासारखी शास्त्रीय विषयांना वाहून घेणारी मासिकेही प्रारंभी निपजली. या प्रयत्नांनी तयार केलेली परिभाषाविषयक भूमिका आजही मराठीतील शास्त्रीय वाङ्मयाला प्रेरक व मार्गदर्शक ठरणारी आहे.

शाळाखात्याच्या शिक्षकवर्गाकरिता नेमलेल्या परीक्षातून पुढे काही भौतिक विज्ञानांना मराठीतून वाव मिळाला. परंतु या विद्यार्थ्यांना ते विषय मराठीतून उत्तमरीतीने शिकवू शकतील अशा शिक्षकांची नेहमी वाण भासत असे. पब्लिक सर्व्हिस सर्टिफिकेटच्या परीक्षा दिलेल्या विद्यार्थ्यांना या भौतिक विषयांचा गंधही नसे. शिक्षणखात्यात पब्लिक सर्व्हिसच्या परीक्षास हे विषय ठेवल्याखेरीज शिक्षणात खरी सुधारणा होणार नाही, व युरोप, अमेरिका इत्यादी राष्ट्रांनी मिळविलेली मान्यताही हिंदुस्थानास मिळणार नाही, अशा आशयाचे उद्गार बाळाजी प्रभाकर मोडक यानी आपल्या 'पदार्थविज्ञानशास्त्र – पूर्वार्ध' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत १८८१ साली काढले आहेत.

जगातील उपलब्ध ज्ञान आपल्या भाषेतून देण्याचे सामर्थ्य स्वभाषेत उत्पन्न करणे हे राष्ट्रीय शिक्षणाचे एक महत्त्वाचे कार्य आहे. उच्चशिक्षित विद्यार्थ्यांची अभिरुची ललित वाङ्मयाच्या शाखेत प्रौढ होते. त्या संबंधीचे भरपूर वाङ्मय त्या त्या भाषेत त्याना उपलब्ध असते. शास्त्रीय विषय परभाषेतून शिकल्यामुळे त्यासंबंधीची गोडीही उत्पन्न होत नाही; ज्यांना उत्पन्न होईल त्यास परभाषेतील ग्रंथातूनच ती पुरवावी लागते. ही प्रतिकूल परिस्थिती बदलण्यासाठी इंग्रजीसारखी मराठी हायस्कुले काढून त्यात इंग्रजीस दुय्यम महत्व द्यावे. इतिहास, भूगोल, पदार्थविज्ञान, रसायन इत्यादी विषय मराठीतून शिकवावे म्हणजे थोडक्या अवधीत शिक्षण होईल. व इंग्रजीचे अज्ञान नसल्यामुळे नोकरीपेशा, उद्योगधंदे यातील प्रतिष्ठाही कमी होण्याचा संभव नाही. दुय्यम शिक्षण मराठीतून दिले म्हणजे उच्च शिक्षणातही स्वभाषेचा प्रवेश होऊन ज्ञानाभिरुची अधिकाधिक प्रगल्भ होईल. द्रव्य आणि बुद्धीचे सामर्थ्य अवास्तव खर्ची घालूनही कित्येकांना विद्येचा लाभ घेता येत नाही, यामुळे उत्पन्न होणाऱ्या अडचणीने वाचनाभिरुचीस आळा पडतो आणि ग्रंथनिर्मितीस प्रतिकूलता उत्पन्न होते. असे उद्गार बाळाजी प्रभाकर मोडक यांनी "पदार्थ विज्ञान–शास्त्राची मूलतत्त्वे" 'उष्णता' पु. ५, (इ. स. १९००) या ठिकाणी काढले आहेत.

शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार व त्यासाठी परिभाषेची निर्मिती यासाठी कोणत्याही राष्ट्रात एकभाषिकत्व आवश्यक ठरते. यात देशी भाषेतून शिक्षण ही शैक्षणिक उन्नतीची पहिली पायरी आहे. देशीभाषांतून, मराठीतून शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार व्हावा यासाठी मराठी माध्यमाचा पुरस्कार करणारे विद्यापीठ हवे. केवळ भाषाभिमानास्तव रचलेल्या ग्रंथांचे भरपूर वाचन व्हावयाचे तर मातृभाषेतून शिक्षण घेतलेला विद्यार्थीवर्ग निर्माण होणे आवश्यक आहे.

अशा रीतीने शास्त्रीय वाङ्मयाची परंपरा .जगविण्यास देशी भाषेतून शिक्षण हाच एक प्रभावी मार्ग आहे.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. भास्कर गिरधारी

# केशवसुतांच्या कवितेतील वैचारिकता

## भूमिका

खऱ्या कवितेतून साकार होणाऱ्या अनुभवाचे स्वरूप काव्यात्म असते. अनन्यसाधारण वा अलौकिक असते. कवितेची अथवा कोणत्याही कलाकृतीची व्याख्या करावयाची झाल्यास Pictured Experience केवळ या दोन शब्दातही करता येईल.

कवितेत अनुभव साकार केलेला असतो. अर्थातच हा अनुभव अनेक घटकांचा (व त्यांच्या विशिष्ट -कमी जास्त प्रमाणांसह) बनलेला असतो. विचार, संवेदना, भावना हे त्या अनुभवातील सहज लक्षात येणारे दोन महत्त्वाचे घटक.

प्रस्तुत ठिकाणी केशवसुतांच्या कवितेतील वैचारिकतेचा शोध घ्यावयाचा आहे. म्हणून काव्यानुभवाचे हे स्वरूप विशद करणे प्रारंभी मला महत्त्वाचे वाटले.

ज्या अनुभवामध्ये 'विचार' या घटकाला प्राधान्य असते, त्या प्रकारच्या अनुभवाला साकार करणारी कविता; जिला स्थूल मानाने वैचारिक कविता आपणास म्हणता येईल. ज्या पद्धतीने काव्यानुभवातील घटकांचा सुटा विचार विवेचन करीत असताना केला जातो. अर्थातच् तसे (सुटे-अलग) स्वरूप अनुभवातील घटकांचे असत नाही. अनुभवातील घटक एकजीव -एकात्म असतात. अनुभवाच्या होणाऱ्या जाणिवेच्या आधारानेच विचारानुभव (वैचारिक कविता) वा भावानुभव (भाव-कविता) हे आपणास सांगता येते.

केशवसुत हे मराठी अर्वाचीन कवितेचे जनक-कुलगुरु: त्यांच्या कवितेचा अनेक दृष्टीने विचार केला गेला आणि केला जात आहे.

मराठी कवितेतील वैचारिकतेच्या परंपरेकडे पाहिल्यास त्याही बाबतीत केशवसुतांची कविता वैशिष्ट्यपूर्णच ठरते. अनेक वैशिष्ट्यांनी परिपूर्ण असलेली केशवसुतांची कविता 'वैचारिक कविता' म्हणून देखील श्रेष्ठ दर्जाची (समृद्ध) ठरते. मराठीत खऱ्या अर्थाने जिला वैचारिक कविता म्हणता येईल तिची वानवाच जाणवते. या दृष्टीने प्रस्तुत ठिकाणी केशवसुतांच्या कवितेतील वैचारिकतेवर लक्ष केंद्रित करावयाचे आहे.

## कालसापेक्ष गुणधर्म

'केशवसुत' हे कविमन ज्या विशिष्ट काळात वावरत होते; त्या काळातील सामाजिक, वैचारिक जाणिवाने त्यांच्या अनुभवविश्वाचे महत्त्वाचे अंग व्यापलेले दिसून येईल. आणि तसे होणेही साहजिक आहे. केशवसुतांच्या कवितेतील वैचारिकता, सामाजिक जाणिवा यामागे हेच संस्कारित मन होते. जीवनातील विविध सौंदर्याचा आणि सामर्थ्याचा ध्यासच या मनाला भारावून टाकीत होता.

तत्कालीन महाराष्ट्र-जीवन अनेकदृष्टीने त्याला कारणीभूत असल्याचे केशवसुतांच्या कवितेच्या स्वरूपाकडे पाहूनच म्हणता येते. अनेक दृष्टीने संपूर्ण समाजातील वातावरण तप्त होते. सगळीकडे प्रमोक्ष आव्हान-उपासना त्यागाचीच भाषा ! टिळक, आगरकर, हरि नारायण यांनी आपापल्या क्षेत्रात जे कार्य केले तेच केशवसुतांनी कवितेच्या क्षेत्रात केले असे आढळेल. कारण हा गुणधर्म त्या कालाचाच. त्या विशिष्ट कालखंडाचाच होता. या नव्या दिशेने काव्य-लेखन करण्याचा थोडाबहुत; भलाबुरा प्रयत्न केशवसुतांच्या पूर्वीही होत होता– नाही असे नाही, परंतु त्यांना नेमकी दिशाच गवसत नव्हती. ह्या प्रयत्नांचे स्वरूप काहीसे चाचपडण्याचेच होते असे म्हणता येईल. केशवसुतांनी हेच कार्य केले; जे अनिश्चित, असंघटित, क्षीण होते त्याला निश्चित, संघटित केले; सामर्थ्य दिले, नवीन दिशा प्राप्त करून दिली.

'फोले पाखडिता तुम्ही
निवडितो ते सत्व आम्ही निके'

–हे पटवून दिले.










राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असे असूनही केशवसुतांनी लिहिलेल्या सान्याच कविता कलादृष्ट्या श्रेष्ठ आहेत असे म्हणता येत नाही. कलादृष्ट्या सरस व नीरस दोन्हीही प्रकारच्या कविता केशवसुतांनी लिहिल्या. केशवसुतांनाही प्राथमिक अवस्था होती. विशिष्ट अवधीनंतर लिहिलेल्या कविताच श्रेष्ठ ठरल्या. त्यासाठी काही काळ जावा लागला. अनुभवाच्या आधाराने जीवनाकडे पहाण्याचा खास केशवसुतांचा जो दृष्टिकोन आहे तो नंतरच प्रगट झाला.

'चतकोरीने मला न सुख
खादाड असे माझी भूक'

–हीच त्यांची जीवन लालसा. या नव्या युगाचे चिंतन (काहीसे प्रगट का होईना) पण त्यांनी केले होते. त्यांच्या कवितेत वैयक्तिक जाणिवा अथवा आत्मपरता असली तरी केशवसुतांनी केवळ स्वतःच्याच जीवनाचा विचार केला होता असे म्हणता येत नाही.

अखिल मानवजातीचा-समाजाचा-त्यांच्या उद्धाराचा एका ध्येयनिष्ठस्वरुपात केशवसुतांनी विचार केला होता. एकीकडे समाजविषयक जाणिवांचा तर दुसरीकडे Romanticism चा परिणाम केशवसुतांच्या वृत्तीवर झाला होता. या वृत्तींनी घडविलेले कविमन स्वाभाविकपणे मानवीजीवनविषयक चिंतनात गढून गेल्याचे आढळले. एवढेच नव्हे तर गूढ अनुभूतींचा स्वीकार करणे हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा महत्त्वाचा धर्म ठरला. यातूनच त्यानी चिंतनिकांना जन्म दिला आहे. आशावादी आणि निराशावादी या दोन्हीही प्रकारच्या प्रवृत्तीमधून केशवसुतांचे गूढगुंजन जन्माला आले. तथापि या भिन्न प्रवृत्ती देखील केशवसुतांच्या एकसंध व्यक्तिमत्त्वाचेच दर्शन घडवितात. त्यांची अनुभव घेण्याची विशिष्ट पद्धती तिच्यात झालेला बदल हीच केशवसुतांच्या कवितेची क्रांती. कवितेतून साकार झालेल्या त्यांच्या जीवनविषयक जाणिवा या खास त्यांच्या बनल्या होत्या. जीवनाला संघटित स्वरूपात साकार करणारी त्यांची काव्यानुभूती आहे.

## केशवसुतांच्या चिंतनाचे स्वरूप

'झपूर्झा', 'म्हातारी', 'आमुचा पेला दुःखाचा', 'कोणीकडून कोणीकडे' ! 'कुठे जाशी तू' या कवितांचा उल्लेख वरील संदर्भात करता येईल.

मानवी जीवनविषयक मूलभूत प्रश्नांचा विचार केशवसुत या कवितातून करीत असल्याचे दिसून येते. जीवनातील विविधतेचा, त्यातील चिरंतन'त्वा'चा, जन्ममरणापलीकडील मनुष्याच्या अवस्थेचा शोध केशवसुतांची कविता घेत असल्याचे दिसते. केशवसुतांच्या संमिश्रभावांना साकार करणाऱ्या व्यक्तिमत्त्वात हे सारे सामावले जाऊ शकते.

जीवित मिथ्या नसून ते झगडण्यासाठीच आहे हे ह्यांनी पुरते ओळखले होते.

'नाही स्वप्न न भास वा बुडबुडा :
जीवित साचे असे'

या जीवनात 'तम अल्प द्युतिबहु' असे त्यांना वाटे. मात्र त्यांची वृत्ती सतत विकासोन्मुख असल्याचे लक्षात येते; त्यामुळेच जीवनविषयक कारुण्यपूर्ण; अगतिक अशी भावनिक प्रक्रिया त्यांच्या कवितेतून जाणवते :

'झिजवित नित्य जिणे तयांना आहे का मरणे'

–असेही ते म्हणतात. मानवी प्रवृत्तीच्या झगडण्यानेच ती अमर होते. 'काट्यावाचून गुलाब नाही' या साऱ्या महत्त्वाच्या जाणिवा त्यांच्या व्यक्तित्वाला अनुकूल आहेत. जीवनाकडे वा जगाकडे पहाण्याची हीच दृष्टी त्यांच्या अनेक कवितांतून दिसून येते.

'अस्मदीय हृदयी ठरलें ।
की जग हे दुःखे भरले' (भृंग)
'काळोखाच्या जगामधे या ।
मृत आशांच्या चिता वरुनिया'
'वाटे नाटक शोकसंकुल
असे जीवित्व हे याजला' (नैऋत्येकडला वारा)
'आमुचा पेला दुःखाचा'
डोळे मिटुनी प्यायाचा (पद्यपंक्ति)
'मीहि कशाला येथ रहावे'
काय असे ज्या मी चिकटावे (वातचक्र)
'तिमिरी आम्ही नित्य रखडणे,
विवंचनांतचि जिणे रखडणे (फुलपाखरास)

दुःखद-व्यथा-वेदनांना साकार करणाऱ्या चिंतन-विचारगर्भ जाणिवा विविध पातळ्यावरून कलापूर्ण रूपानेच प्रकट झाल्या आहेत.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'सुनीत' हा काव्य प्रकार याच चिंतनपरंपरेतून आलेला आहे. केशवसुतांनी 'सुनीत' लिहिले ही गोष्टही मोठी सूचक म्हणावी लागेल. केशवसुतांच्या प्रतिभेला अनुकूल म्हणूनच 'सुनीत' आलेले आहे. त्यांची मनोवृत्ती चिंतनगर्भ व अंतःकरण विलक्षण संवेदनाक्षम असल्याचे दिसून येते. त्यांच्या या चिंतनाची आविष्कृती काव्यमय असल्यामुळेच केशवसुतांची कवीची भूमिका अबाधित राहिली. आणि कविताही मराठीतील श्रेष्ठ दर्जाची वैचारिक कविता ठरू शकली. या मराठीतील चिंतक कवीच्या चिंतनाचे विषय अव्यक्त अरूप अशा आत्मतत्त्वाचा साक्षात्कार घडविणारे आहेत. स्वानुभूती, आत्मप्रचीती या मागे असल्यामुळे रसरशीत, अस्सल व जिवंत जीवनानुभवाला केशवसुत यशस्वीपणे साकार करू शकले. म्हणूनच मराठी साहित्यात त्यांच्या चिंतनिका मौलिक ठरतात.

तो मज गमले विभूति माझी
स्फुरत पसरली विश्वामाजी
दिक्कालासहि अतीत झालो
उगमी विलयी अनंत उरलो
विसरुन गेलो अखिल भेदा ( सतारीचे बोल )

येथे केशवसुत साकार करतात विभूतिमत्त्वाच्या उत्कट जाणिवेला आणि आत्मतत्त्वाच्या प्रतीतीला ! त्याचा नुसता ओझरता स्पर्शही केशवसुतांना पुरेसा होतो. लगेच ते अंतःकरणातील भेद विसरतात आणि अद्वैत पटते. ह्याच ठिकाणी निर्द्वंद्वावस्थेला साकार करणारा श्रेष्ठ-कलात्मक विचारानुभव साक्षात होतो. 'झपूर्झा' ह्या त्यांच्या सर्वश्रेष्ठ कवितेतही ( चिंतनिकेतही ) एका गूढ जाणिवेच्या स्पंदनाला त्यांनी शब्दबद्ध केलेले आहे. सुखदुःख निरपेक्ष द्वंद्वातीत अवस्था चित्रित करण्याचा केशवसुतांचा झपूर्झा ही कविता एक महान यशस्वी प्रयोग आहे असे म्हणावे लागेल.

'क्षणात नाहिसे होणारे दिव्यभास या कवितेत भग्न तन्मयतेचे सुंदर चित्र केशवसुतांनी चित्रित केले आहे.

## वैचारिकतेची विविध रूपे

केशवसुतांच्या गाजणाऱ्या साऱ्याच चिंतनिका; त्यातील चिंतनाचा, विचारांचा आविष्कार भावनामय आहे. आणि म्हणून त्या विचारांना विचारानुभव 'त्व' प्राप्त होते. अशा प्रकारच्या कविता मोजक्या असल्या तरी कवी म्हणून केशवसुतांचे मोठेपण सिद्ध करण्यास पुरेशा होतात. त्यांच्या या कवितांना अनेक परिमाणे लाभतात. म्हणून त्याचे भिन्न भिन्न अर्थ लावले गेल्याचे दिसून येते. त्यात कुठेही विचारांचे प्रतिपादन Interpretation नाही, तर सतत चिंतनाने अनुभवले तेच साकार झालेले दिसते.

इंग्रजी अथवा अन्य भाषेतील काव्यवाचनातून जन्मलेल्या आत्मपरतेला केशवसुतांनी आत्मसात केले. खास मराठी परंपरेशी जुळविले. कलावंताच्या अनुभवाचे संघटन करणारे तत्त्व त्या विशिष्ट काळाच्या आणि विशिष्ट व्यक्तीच्या विशेषातून निर्माण होत असते, अर्थातच केशवसुतही या नियमाला अपवाद नाहीत.

केशवसुतांनी सामाजिक क्रांतीच्या व राष्ट्रीयत्वाच्या भावनेतून उत्स्फूर्तपणे लिहिलेल्याही काही कविता आहेत. मात्र त्यांच्या या प्रकारच्या कविता म्हणजे तत्कालीन सामाजिक व वैचारिक प्रबोधनाची उत्कट अभिव्यक्ती आहे. या संदर्भातच 'केशवसुतांनी मराठी कवितेला सामाजिक आशयाची अपरिहार्य बैठक मिळवून दिली.' हे विधान केले जाते. यात 'तुतारी' 'नवा शिपाई' 'स्फूर्ति' इत्यादी कवितांचा समावेश होतो. पण केशवसुतांचे खरे सामर्थ्य तुतारी वा तत्सम अन्य कवितात नाही. त्यांची ही सामाजिक म्हटली जाणारी कविता भिन्न प्रकारची ठरते. केवळ सामाजिक विषयापुरतीच मर्यादित स्वरूपाची ती रहाते. याचे कारण तत्कालीन सामाजिक जीवनात आढळणाऱ्या रूढी, जुलूम, अन्याय इत्यादी विषयांवर ती स्थिर आहे. समाजदोषांवर हल्ला करण्याचा प्रयत्न इथे अगदी स्पष्टपणे दिसून येतो. उदा०:–

'ब्राह्मण नाही, हिन्दु, नाही, न मी एक पंथाचा,
तेच पतित की जे आखडिती प्रदेश साकल्याचा'
'देव–दानवां नरें निर्मिले हे मत लोका कवळूं द्या.'
'बंडाचा तो झेंडा उभवुनि धामधूम जिकडे तिकडे
उडवुनि देऊनि जुलमाचे या करूं पहा तुकडे तुकडे'

नेमकी हीच केशवसुतांची प्रवृत्ती–भूमिका–कलाविघातक ठरली. समाजातील विषमतेचा तीव्र निषेध मांडणारे सुधारणावादी विचार ते ठरतात. त्यांनी फुंकण्यासाठी 'तुतारी'च का घेतली ? कारण हेच की









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तिच्या तालावर रणगीत गाता येत होते. केशवसुतांच्या ह्यासारख्या कवितात सूचकता कमी होते; सूक्ष्मतेचा अभाव जाणवतो आशयाऐवजी विषय आणि तोही अभिधारुपांतच प्रगट होतो. 'अन्त्यजाचा प्रश्न' अथवा 'मजूरावर उपासमारीची वेळ' या कविताही गद्याच्याच पातळीवर गेल्याचे दिसून येते. या गद्य-प्रायता असलेल्या केशवसुतांच्या कविता 'प्रेयस्' वाटल्या तरी नक्कीच त्या 'श्रेयस' नाहीत. आगरकर; टिळकांच्याच विचारांचा साक्षात्कार त्यांच्या या स्फूर्ती-गानातून होतो. या कवितांना कलात्मक पातळी न लाभता पातळी लाभते वक्तृत्वाचीच! इथे गद्य अनुभूती गद्यरूपातच अभिव्यक्त होताना दिसते.

यापेक्षा मराठी वैचारिक कवितेच्या एका वेगळ्या वैशिष्ट्यांवर प्रकाश टाकणारी कविता केशवसुतांनी लिहिली आहे. त्यांची काव्यविषयक स्वतःच्या जाणि-वांना मूर्त करणारी विशेष लक्षणीय ठरते ती कविता! केशवसुतांच्या अनुभूतीचे एक महत्त्वपूर्ण अंग त्यात आढळते. साहित्याची अथवा कवितेची चर्चा कविते-तून ते करीत नाहीत. काव्य–शास्त्र त्यांना मांडावयाचे नव्हते. ('बी' कवींच्या सारखी ती कविता नव्हे.) या कवितांची जातच निराळी आहे.

तो काळच असा होता की त्याकाळात काव्य हा वाङ्मयप्रकार सामान्य दर्जाचा मानला जाई. महत्त्व दिले जात होते ते गद्याला, निबंधालाच! तिथे खरो-खरीच कवींची आणि रसिकांचीच उणीव भासत होती.

अशावेळी केशवसुतांनी कवितेची मूल्ये, कवितेकडे पहाण्याची त्यांची खास दृष्टी, काव्यानुभूती कविते-तूनच मांडली. या वाङ्मयप्रकाराची वेगळीक आणि ओळख पटविण्याचाच त्यांचा हा प्रयत्न होता असे म्हणता येईल. अर्थात् यांतून त्यांना नुसते विचार सांगावे एवढेच अभिप्रेत नव्हते तर ती त्यांची स्वानुभूती होती. म्हणूनच ते–

'अशी असावी कविता फिरून<br>
तशी नसावी कविता म्हणून<br>
सांगावया कोण तुम्ही कवीला<br>
आहात मोठे ? पुसतो तुम्हाला'

–असे म्हणतात. 'कवीस सोडा कविते बरोबरी' हेच त्यांच्या दृष्टीने खरे!

केशवसुतांचा खऱ्या कवीचा पिंड लक्षात घेता हे 'नवकाव्य समर्थन' नसून ही भूमिका नवकाव्य निर्मात्याची होती असे निश्चितपणे त्यांच्या काव्यविषयक कवितेच्या स्वरूपावरून म्हणता येईल. त्यातूनच त्यांचे हे काव्यचिंतन स्फुरलेले आहे. त्यांच्या अनुभूतीचाच तो अपरिहार्य भाग होता. एका महान् कलावंताची ती प्रामाणिक तळमळ होती.

'बी' कवींच्या सारखे भारदस्त आणि तर्कनिष्ठ भाषेत केशवसुत आपल्या काव्यविषयक कल्पनांचा आढावा घेत नाहीत. त्यांच्या मानसिक प्रक्रिया व्यक्त करणाऱ्या या कविता अनन्यसाधारण ठरतात. मराठीत तरी त्याला तोड नाही, असे म्हटल्यास वावगे वाटू नये.

तात्पर्य, केशवसुतांच्या कवितेत अवतरलेली वैचारि-कता आगन्तुक नाही. ती श्रेष्ठ दर्जाची वैचारिक कविता ठरू शकते. भावानुभव आणि विचारानुभव या दोन अनुभवघटकांपैकी दुसऱ्या प्रकारच्या अनुभवांना साकार करणारी ती कविता आहे. म्हणूनच कलादृष्ट्याही ती सरस ठरते. कलात्मक पातळी अबा-धित राखूनच केशवसुतांची वैचारिकता (अनुभव–भाग बनून). आलेली आहे.

केशवसुताच्या कवितेतील वैचारिकतेचे हेच खरे वैशिष्ट्य आहे.

---



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. भाऊ मांडवकर

# गोंडांची आडनावे आणि कुलचिन्हे

आदिवासींच्याच नव्हे तर इतर समाजांच्याही आडनावांमधून त्या त्या आडनावाच्या लोकांचे वा पूर्वीच्या त्यांच्या कुलसमूहाचे कुलचिन्ह प्रकट होते. पूजनासाठी जे कुलचिन्ह एखाद्या कुलसमूहाने निवडले वा ओळखचिन्हाच्या निमित्ताने स्वीकारले तेच त्या कुलसमूहाला पूज्य ठरून त्या कुलाचे कुलनाम, उपनाम वा आडनाव ठरले. सर्वच समाजात बहुशः हे घडले असले तरी नावीन्य, आपले नाव नीट न वाटणे, अन्य प्रासंगिक कारणे वगैरेंमुळे समंजसपणा व नवनवे सुधार आत्मसात करणाऱ्या समाजांनी आपली मूळ आडनावे काही जागी बदललेली आढळतात. आदिवासींच्याही बाबतीत हे घडले नाही, असे नाही; पण अशा गोष्टींचे प्रमाण त्यांच्यामध्ये, पुढे गेलेल्या इतर जातींच्या मानाने एकंदरीत कमीच आढळते. तरीपण, त्यांची पूर्वापार चालत आलेली जी आडनावे आहेत त्यांमधून त्यांच्या कुलचिन्हांचा परिचय मिळतो.

### मकारान्त आडनावे

आदिवासींची आडनावे प्राचीन असून त्यातील काही संस्कृतातील धाटणीप्रमाणे मकारान्त आहेत. तामिळ भाषेचे अभिमानी पंडित द्राविडी भाषांना संस्कृतपेक्षाही जुन्या समजतात; आणि आर्यपूर्वी या देशात असलेले अनार्य आदिवासी द्राविडी मानले जातात, हे सूत्र लक्षात घेतल्यास संस्कृतप्रमाणे वाटणारी मकारान्त आदिवासी आडनावे चिंत्य ठरतात !

### विदर्भपरिसरातील गोंडांची आडनावे

महाराष्ट्र आणि आंध्र या दोन प्रांताच्या सीमारेषेवर वसलेल्या कोलाम या आदिवासी जमातीमधील आडनावांचा कुलचिन्हांच्या दृष्टीने मी माझ्या 'कोलाम' या ग्रंथात शक्य तेथे व शक्य तेवढा विचार विस्ताराने केला आहे.[1] प्रस्तुत लेखात गोंड जमातीमधील काही आडनावांच्या कुलचिन्हांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न असून गोंडांची काही विशिष्ट आडनावे पडण्यामागे कोणती कारणे असू शकतात, त्याचा गोंडी भाषेच्या आधारे कयास घेण्यात आला आहे. चर्चेसाठी निवडलेली बव्हंश आडनावे विदर्भ–मध्यप्रदेश या परिसरात राहणाऱ्या गोंड जमातीमधील आहेत.

### वृक्ष, कुलचिन्ह आणि आडनाव

आदिवासींची ( आणि इतर जमातींची पण ) काही आडनावे झाडांवरून पडलेली दिसतात. आदिवासींच्या देवता उघड्यावरच्या व निसर्गातील वस्तूंच्या, हे ठरलेले ! त्यांचा नेहमी संबंध यायचा तो दगडधोंडे, दऱ्याखोऱ्या आणि जंगले यांच्याशीं ! जंगलात इतस्ततः विखुरलेल्या नाना प्रकारच्या झाडाझुडुपांची व लतावेलींची त्यांना जवळीक ! अशा वस्तूंचा वापर स्वतःच्या कुलचिन्हांसाठी त्यांनी हमखास केला. जेथे वस्ती केली तेथे प्रामुख्याने असलेले झाड तेथे वसणाऱ्या लोकसमूहाचे पूज्यस्थान ठरले. त्यावरूनच इतर लोक तेथे वसणाऱ्या लोकांस त्या झाडाला पूजणारे, त्या झाडाजवळ वसणारे अशा आशयाने ओळखू लागले. खुद्द तेथे वसलेली कुटुंबेही स्वतःची तशीच ओळख देऊ लागले. अशा कुटुंबांचा आकार आरंभी अतिशयच लहान असणार. त्यांचा विस्तार पुढे झाला असेल आणि हा विस्तारलेला कुलसमूह इकडेतिकडे दूरवर विखुरला असणार हे ओघाने आलेच. गोंडामधील तेकाम, मरकाम, पुरकाम, गेडाम, इळपाते, मडावी ही आडनावे वृक्षांशी संबंधित आहेत. यातील बहुतेक आडनावे संस्कृत धाटणीची वाटावीत अशी मकारान्त आहेत.

वृक्षांशी संबंधित असलेल्या या आडनावांचा तपशील पाहू या –

### तेकाम

हे आडनाव तेकाम, टेकाम, तैकाम, टैकाम अशा वेगवेगळ्या तऱ्हांनी उच्चारले जाते. गोंडी भाषेत सागाच्या झाडास तेक किंवा टेक असा शब्द आहे. हा

१. भाऊ मांडवकर, कोलाम : पृ. ९८ ते १०६



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उच्चार बहुधा 'तेका' असा जास्त आढळतो. कोलामी बोलीतही 'तेक'चा अर्थ साग (सागवानी लाकूड वा सागाचे झाड) असाच असून इंग्रजीतील Teak (टीक) हा शब्द व गोंडीकोलामीतील 'तेक–टेक' हे शब्द यांचे चेहरेमोहरे मिळतेजुळते आहेत. गोंड, कोलाम इत्यादी आदिवासींचा परिसर सागवानी वृक्षांनी व्यापलेला आहे. एखाद्या कुळाच्या लोकांनी सागाला आपले कुलचिन्ह निवडून वा तसे घडून येऊन ती देवता मानली गेली असावी, हे उघड आहे. कदाचित आपण ज्या झाडाच्या आश्रयाला आरंभी राहिलो त्याचेच ओळखचिन्ह त्या गटाच्या लोकांना लाभले असावे. इतर गटांकडूनही त्या गटाच्या ओळखीसाठी नाव देण्याची वा नाव पाडण्याची प्रक्रिया घडली असण्याची शक्यता आहे. अशा लोकांचे पुढे ते आडनाव होऊन बसले.

### मरकाम

मरकाम हे आडनाव गोंडातच आढळून आले आहे. 'मरका' या शब्दाचा अर्थ आहे 'आंबा'. आंब्याचे झाड आधीपासून ज्या गटाच्या लोकांना जवळचे, ते लोक झाले 'मरकाम'. आंबा हा या आडनावाच्या लोकांना देवतास्वरूप झाला. आजही तो देवतास्वरूप आहे. नव्या पिढ्या विसरू लागल्या, अर्थही भुलल्या तर वेगळे; पण आठवणारांना, परंपरेने जुने चालू असलेल्या सगळ्या 'मरकाम' मंडळीत आंब्याचे विशेष महत्त्व असले पाहिजे, हे फक्के धरून चालावे! आता, काही गोंडांना सुशिक्षित जगात वावरावे लागते आणि आपण गोंडांसारखे अगदीच मागासलेलो नाही हे त्यांना दाखवायचे असते म्हणून म्हणा, की जुने हेंगाडेंपण (?) त्यागून नव्याचा स्वीकार करण्याची मानवी प्रवृत्ती म्हणून म्हणा, काही 'मरकामां'नी आपले आडनाव 'आंबेकर' असे करून टाकले!

अशा तऱ्हेने आडनावांचे नविनीकरण गोंडांमध्ये होते असे आणखी काही उदाहरणांवरून वाटते. मुळात 'उयके' हे आडनाव असलेल्या गोंडांनी आपले आडनाव 'वाघमारे' असे केल्याचे उदाहरण आहे. या आडनावाची काही कुटुंबे 'महाबाग' (महावाघ? महाभाग?) याही आडनावाने ओळखली जातात. प्राण्यांचेही कुलचिन्ह आडनावात आढळते, ही प्रक्रिया लक्षात घेतल्यास 'मोठ्या वाघा'शी या आडनावाचा संबंध दिसतो.

### पुरकाम

या आडनावाच्या गोंडांचे मूळ कुलचिन्ह भोपळा (कोहळे नव्हे; ज्याचा तुंब्या करतात तो कडूभोपळा किंवा ज्याला दुध्या–दुधी म्हणतात तो दुधीभोपळा) हे आहे. गोंड, कोलाम, गोवारी वगैरे आदिवासींच्या किंवा तसे गरिबीचे जीवन जगणाऱ्यांच्या झोपड्यांवर, झोपड्यांभोवती, झोपडयांच्या आसपास किंवा वस्तीच्या परिसरात भोपळ्यांचे वेल विपुल असतात. त्यांना त्यांच्या विश्वात आर्थिक दृष्ट्या फारशी किंमत नाही. अशा या भोपळ्यांच्या शेजारी राहणारे लोक 'भोपळे' म्हणून ओळखले गेले असणार हे उघड आहे. सान्निध्याने प्रेम उत्पन्न झाले व तेथे वसणारांनी भोपळ्यालाच ओळखचिन्ह आणि अनुषंगाने देवरूप मानले असे निश्चितच दिसते.

### गेडाम

'गेडा' या शब्दाचा अर्थ गोंडी भाषेत लाकूड असा आहे. गोंडांतील एखाद्या समूहाने लाकडाला मुळात देवता मानली असेल किंवा लाकडांच्या जवळिकीमुळे ती त्या समूहाची ओळखीची खूण ठरली असेल. झाडेझुडुपे आणि लाकडे यांचा अन्योन्य संबंध आहेच. लाकडाला प्रथमपासून पूजणारे, त्यावरून ओळख पटणारे ते 'गेडाम' ठरले व त्यांचे कुलचिन्ह लाकूड हेच पूर्वापार चालत आले, हे स्पष्ट आहे.

गेडाम हे आडनाव आदिवासींमध्ये तर आहेच; पण महार आणि मराठा लोकांतही ते आहे. अनेकानेक जातीजमातीत एकच आडनाव असण्यात एक विशिष्ट सूत्र असणे असंभवनीय नाही. अर्थात हा एक स्वतंत्र विषय असून त्याचा या लेखात अंतर्भाव करणे उचित होणार नाही.

### इळपाते

इळपाते या आडनावाच्या अक्षरातील 'ळ' हा मूळचा 'र' आहे. 'ळ' आणि 'र' यांचा घोटाळा पूर्वविदर्भात फार होतो. 'दाळ' या शब्दाचा उच्चार बरेच ग्रामीण लोक 'दार' असा करतात; तर 'दळण' चे 'दरन' करून टाकतात! विळा हा शब्द त्यांच्या



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दृष्टीने 'इरा' ठरतो. ही बाब लक्षात घेतल्यास 'इळपाते' हे 'इरपाते' ही आहेत हे ठरते. 'इरपाते'चे शुद्धी–करण (!) करून 'इळपाते' आडनाव सांगितले जाते, हे उघड आहे. 'इरपाते'चे 'इळपाते' हे 'शिक्षित-रूप' आहे. गोंडांमध्ये या आडनावाची ही दोन्ही रूपे आढळतात, हे खरे !

प्रस्तुत आडनावात 'इरुप' हा मूळ शब्द असून 'इरुप'चा अर्थ गोंडीमध्ये 'मोहाचे झाड' असा आहे. मोह ही तर आदिवासींची आवडती वस्तू ! मोहाची दारू हा त्यांच्या जीवनातील महत्त्वाचा भाग ! नृत्योत्सवांच्या धमालीत मोहांचे व मोहांच्या दारूचे अपार माहात्म्य ! उन्हाळ्यात पहाटेच्या वेळी जंगलातील मोहाची झाडे हेरून आणि धुंडाळून मोहांच्या झाडाखाली सांडलेले मोह वेचण्यासाठी तरुणींची काय धडपड चालायची ! मोह फक्त दारूसाठीच उपयोगाचे नसून ते माणसाचे अन्नही आहे. गुरांचे ढेपीसारखे सकस अन्न म्हणून त्यांचा उपयोग होतो ते पुन्हा वेगळेच ! अशा माहात्म्याने युक्त असलेल्या मोहवृक्षाजवळ राहणारे, त्या वृक्षास पुजणारे, त्या वृक्षावरून ओळखले जाणारे ते 'इरपाते' झाले, हे अगदीच स्पष्ट आहे.

कोलामी भाषेतही 'इरिप' किंवा 'हिरिप' असा शब्द असून त्याचाही अर्थ मोह वा मोहाचे झाड असा आहे. आदिवासींचा हा वैशिष्ट्यपूर्ण शब्द असून त्याचा त्यांच्या जीवनाशी व कुलचिन्हाशीही संबंध आहे.

### मडावी

मडावी हे गोंडांतील आडनाव 'मडा' या शब्दाच्या अनुरोधाने तयार झाले आहे. 'मडा' या शब्दाचा अर्थ गोंडी भाषेत झाड असा आहे. झाडा-शेजारी राहणारे, झाडाच्या खुणेवरून ओळखले जाणारे वा झाड हे प्रथम–दैवत मानणारे लोक 'मडावी' म्हणून समाजात परिचित झाले. झाड हे मडावी या कुळाचे कुलचिन्ह आणि दैवत आहे.

वर चर्चिलेल्या सहा आडनावांपैकी तेकाम, मरकाम, पुरकाम आणि इळपाते या चार आडनावांमध्ये अनुक्रमे साग, आंबा, भोपळा आणि मोह या चार झाडांचे कुलचिन्ह प्रकटले असून त्यांत विशिष्ट झाडांचे उल्लेख आहेत; तर मडावी आणि जेडाम या दोन आडनावांमध्ये सर्वसाधारण झाड आणि लाकूड ही दोन कुलचिन्हे अनुक्रमे प्रकटली आहेत.

### 'माती'शी संबंधित 'तोडसाम'

झाडेझुडुपे हे जसे कुलचिन्ह शोधण्याचे साधन, तद्वतच जीवतात नित्यसंबंधात येणाऱ्या वस्तूही या बाबत सहायक ठरू शकतात. आदिवासींच्या जीवनात नित्य आढळणाऱ्या व जवळीक निर्माण होणाऱ्या काही वस्तूंवरूनही गोंडांची आडनावे पडली आहेत.

तोडसाम आणि तोडाम या आडनावांमध्ये 'तोडी' हा मूळ शब्द असून ह्या शब्दाचा अर्थ गोंडी भाषेत 'माती' असा आहे. माती ही आदिवासींना अति प्यार ! धरतीमातेचे पोट फाडून पीक काढणे पसंत नव्हते म्हणून तर आदिवासींनी पूर्वकाळात औजारा-वाचून, बी पिस्कारून शेती केली आणि शेती स्थलांतरित केली तीही त्याचमुळे ! मातीत राबणारे, मातीच्या ढिगाऱ्याजवळ नांदणारे, मातीशेजारी जगणारे, शेती करणारे अशा अर्थांचे संदर्भ या आड-नावातून फलित होऊ शकतात. माती हे या आड-नावाचे मूळ ओळखचिन्ह वा कुलचिन्ह आहे हे यावरून दिसेल.

तोडसामप्रमाणेच तोडाम आडनावही गोंडामध्ये फार कमी प्रमाणात आढळते. ताडाम हे आडनाव मात्र अधिक प्रमाणात आहे. ताडाम हे मूळचे तोडाम असावे. ताडाम हे नंतर प्रचारिले गेलेले रूप असणे संभवते. तालाम व ताडाम हे एकमेकांचे पर्याय असून दोहोंचा प्रचार गोंडात आहे.

ताल या शब्दाचा अर्थ कोलामी भाषेत डोके असा आहे आणि गोंडीतही तला असा शब्द डोक्याला आहे. प्राणी आणि त्यांचे अवयव किंवा प्राण्यांची व प्राण्यांच्या अवयवांची हाडे ही देवतारूप मानल्यामुळे कुलचिन्हांच्या रूपाने काही कुलसमूहांच्या पारंपरिक जीवनाशी निगडित ठरली. प्रस्तुत आशय लक्षात घेतल्यास तालाम या आडनावाच्या लोकांचे कुलचिन्ह डोके असले पाहिजे, असे दिसते.

### 'घट' आणि 'घोडाम'

'घोडाम' या मकारान्त उपनावाचा संबंध मातीच्या घड्याशी आहे. या आडनावात मूळ शब्द घोडी हा









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असून 'घोडी'चा अर्थ आहे पाण्याचे मडके, मातीचे भांडे, माठ वा कलश ! 'घडा,' 'घट' आणि 'घोडी' यांचे तोंडवळेही समसमानच दिसतात. कलश हे ज्यांचे कुलचिन्ह ते 'घोडाम', अशी या आडनावातून अर्थनिष्पत्ती होते. कलश एरवीही सर्वत्र पूज्यच मानण्यात येतो. आदिवासींच्या एखाद्या कुलगटाला कलश पूज्य ठरला असल्यास नवल नाही. माती आणि मातीचा कलश ह्या स्वस्त आणि जीवनाशी संबंधित अशा बाबी म्हणूनही आदिवासींना त्या जवळच्या झाल्या असणे साहजिक आहे.

### प्राण्यांशी संबंधित कुलनामे

झाडेझुडुपे, माती आणि घट यांप्रमाणेच आदिवासींच्या संबंधात येणारे प्राणी, त्यांच्या प्रतिमा, प्राण्याचे अवयव आणि त्यांची प्रतीके यांना प्रथमारंभी पुजून त्यांच्या नावे ओळखले जाणारे लोक ती ती आडनावे घेऊन समाजात जगू लागले. प्राण्यांशी व त्यांच्या अवयवांशी संबंधित अशी काही आडनावे पुढे चर्चिली आहेत.

### कोडापे

'कोडा' हा शब्द 'कोडापे' या आडनावात असून 'कोडा'चा अर्थ गोंडी भाषेत 'घोडा' असा आहे. घोड्याचे आधीपासूनचे पूजक 'कोडापे' झाले, हे सांगावयास नकोच ! विशेष म्हणजे द्राविडी भाषांत क, ख, ग, घ हे वर्ण समानोच्चाराकडे धावतात, या वस्तुस्थितीचा विचार केल्यास 'कोडा' व 'घोडा' ही दोन्ही रूपे मुळात एकच असण्याचा संभव आहे. तसेच कोडापे हे आडनाव विदर्भात अपवादादाखल का होईना, ब्राह्मण जातीतही आढळते. हे ब्राह्मण मूळचे आदिवासी असावेत, हा एक तर्क असून त्याचा सविस्तर विचार दुसऱ्या एखाद्या लेखात करता येण्यासारखा आहे. येथे त्यावरील चर्चा टाळलेली बरी.

घोडा हा शब्द मुळात द्राविडीच आहे. गोळा किंवा घोळा असा हा द्राविडी तद्भव शब्द असून तेलगूत 'गुरी', कानडीत 'कुद्री', तामिळमध्ये 'कुटिरै' असे शब्द घोड्यासाठी आहेत. द्राविडीत 'कुडरे' व तेलगूत 'गुर्रमु' असेही शब्द घोड्यासाठी असून कोलामी भाषेत गुर्रम, गुर्राम, घुर्राम असे शब्द त्यासाठी आहेत. 'कुदि' म्हणजे 'उडी मारणे' हा शब्द तर घोड्याच्या वायुवेगे धावण्याच्या लक्षणाशी संबंधितच आहे. 'घोट्' हा ऑस्ट्रिक शब्द याच अर्थाचा असून 'मूळ शब्द द्राविडी दिसतो. घोटक हे त्याचे संस्कृतीकरण उत्तरकालीन आहे' असे कृ. पां. कुळकर्णी यांचेही मत आहे.[1] हा सर्व विचार जमेस धरल्यास कोडापे हे खास आदिवासी आडनाव ठरते व घोडा हे या आडनावाच्या लोकांचे कुलचिन्ह असल्याचे सिद्ध होते.

### नेताम, नैताम

नेताम आणि नैताम या दोन्ही उच्चारांनी ओळखले जाणारे हे आडनाव धारण करणारे लोक कुत्र्याचे पूजक आहेत. 'नय–नै' या शब्दाचा अर्थ गोंडी भाषेत कुत्रा असा आहे. कुत्रा हा आदिवासींना शिकारीमुळे व वस्तींच्या संरक्षणाच्या त्याच्या उपयोगामुळे अधिक जवळचा आहे. तेव्हा, कुत्र्यासारख्या उत्तम प्राण्यास आपले कुलचिन्ह म्हणून एखाद्या कुलसमूहाने सर्वारंभी निवडले असल्यास नवल नाही किंवा कुत्रा जवळ बाळगल्याने झालेल्या प्रचारातून नैतामांची ओळख प्रथमपासून पटू लागली असल्यास त्यात वावगे काही नाही.

भीती आणि गरज यातून काही प्राणी, वस्तू आणि व्यक्ती माणसास आणि समाजास जवळच्या होतात, ही विचारधारा लक्षात घेतल्यास कुत्र्याच्या 'देवपणा'चा उलगडा होतो. कुत्र्यास 'खंडोबा' म्हणतात आणि खंडोबा ही अनेक मराठी कुटुंबांची कुलदेवता आहे. कुलचिन्हाच्या रूपात अशा तऱ्हेने मराठी लोकात प्रचलित असलेला हा खंडोबा वा कुत्रा नेताम (नैताम) आडनावांच्या गोंडांचे कुलचिन्ह आणि पर्यायाने कुलदेवता म्हणून आहे.

### आतराम

अत्राम, आत्राम, अतराम, आतराम अशा विविध उच्चारांनी प्रचारात असलेले हे आडनाव कोलामात आणि गोंडांत आहे. कोलामी भाषेत 'आते' या शब्दाचा अर्थ कुत्रा असा असून त्याचा संबंध या आडनावाशी कुलचिन्हासारखाच असावा. कुत्रा हा आदिवासींना जवळचा आहेच; तेव्हा ते कुलचिन्ह या आडनावाच्या लोकांचे असणे साहजिक आहे.

१. कृ. पां. कुळकर्णी : मराठी व्युत्पत्ती कोश, पृ. २७५.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## ' प्राण्यांचे अवयव ' की ' विनोद ' ?

मसराम, पेंदाम आणि खंडाते या गोंडी आडनावामधून प्राण्यांच्या अवयवांचा संबंध प्रकट होतो असे म्हणावे लागेल किंवा ती आडनावे पडण्यामागे त्या लोकांना चिडविण्याचा भाव असावा. अश्लीलतेकडे झुकणाऱ्या आडनावांबाबत ' चिडविणे–चीड पाडणे ' हे कारण सांगितले जाते. गोंडांतील पेंदाम वा पेंडाम या आडनावाची अशीच स्थिती आहे. पेंडा या शब्दाचा अर्थ गोंडी भाषेत गुद किंवा गुदद्वार असा आहे. ' पेंडाम'चे उत्तररूप ' पंध्राम ' ( पंधराम ) असे असून या आडनावाशी विकृत अर्थ आहे असे पाहून अलीकडे या आडनावाचे काही लोक ' पंधरे ' असे त्याचे सुधारलेले रूप तयार करून वापरतात. गुद हे कुलचिन्ह म्हणून स्वतः कोणी निवडणे शक्य वाटत नाही. पण इतरांनी ते एखाद्या कुलसमूहाला देणे व त्यांच्यावर लादणे अशक्यही नाही. या दोहोंपैकी कोणत्यातरी एका कारणातून या आडनावाचा उद्भव शोधावा !

मसराम या आडनावामध्ये 'मसर' हा गोंडी भाषेतील मूळ शब्द असून त्याचा अर्थ नाक असा आहे. वरीलप्रमाणेच प्राण्याचा एक अवयव या आडनावात आढळतो. 'नाक' हेही एक कुलचिन्ह मुळात आवडीने स्वीकारलेले किंवा परंपरेने स्वेच्छेने चालविलेले नसेलच असे नाही. कदाचित् कानफाडे, नाकाडे वगैरेसारखे चिडविणेही त्यामागे असेल. ' चिडविणे ' हे कारण ' मसराम ' मध्ये गौणत्वाने संभवते आणि 'नाक' हे आदिकुलचिन्ह असणे अधिक संभाव्य वाटते. आदिवासींना जवळ दिसणारी वस्तू स्वपरिचयार्थ अधिक जवळची ! त्याच त्या वस्तू त्यांच्या जीवनाला व्यापून उरायच्या ! स्वतःच्या गोतवळयातील मृताच्या अस्थींना पूज्य मानून त्या अस्थी अलंकाररूपाने अंगावर वागविणारा वर्ग आदिवासींमध्येच आढळतो; या वास्तवतेचा अर्थ नीट ध्यानी घेतला तर प्रिय व्यक्तींच्या नाक कानादी अवयवांना, त्या अवयवांच्या अस्थिचर्मादिकांना किंवा तसल्या आकारप्रतिमांना देवतास्वरूप, पूज्यरूप मानणारे लोक नसतीलच असे म्हणवत नाही. आणि फक्त मानवांचेच अवयव याबाबत गृहीत न धरता इतरही प्राण्यांचे अवयव तेथे गृहीत धरले तर या मताला आणखीच बळकटी येते. मानवी अवयवांपेक्षा इतर प्राण्यांचे अवयव पूज्य मानायला अडचण नाही. काही ग्रामीणात मेलेल्या कुत्र्याच्या मुखवस्त्याचा अस्थियुक्त भाग दारवठ्यावर लपवून ठेवण्याची प्रथा आहे. वर्षानुवर्षे तो मुखवटा तेथेच वळचणीत लपलेला असतो. त्यामागे भूतबाधेला प्रतिबंध करणे ही भावना असली तरी ओघानेच, भीतीतून निर्माण झालेल्या देवकल्पनेचाही भाग त्यात आहे हे मान्य करावे लागेल. तो मुखवटा भुतांपेक्षा प्रभावी म्हणून जवळचा आहे असे त्यावरून स्पष्ट दिसते. आदिवासींचा संबंध सजीव आणि मृत अशा वाघ, डुकर, गाय, शेळी इत्यादी प्राण्यांशी फार येतो. शेळया, बकरे, डुकरे व वाघ यांचे तर देवतांना बळी अर्पण केले जातात ! देवतार्पित अशा त्या प्राण्यांची हाडे, त्यांचे अस्थिरूप अवयव यांचे दर्शन त्यांना नेहमीच घडते ! त्यामागे त्यांची पूज्यभावनाही संभवते. किंबहुना ज्याचे संबंध जास्त व ज्याची भीतीही जास्त त्याच डुकर-वाघासारख्या प्राण्यांना देवतारूप मानण्यावर आदिवासींचा विशेष भर आहे. या पार्श्वभूमीवर मानवेतर प्राण्यांच्या अवयवांना गोंडांनी कुलचिन्ह मानले असेल असे निश्चित मानले असेल असे निश्चित वाटते. या धोरणाने ' मसराम'ची उकल तर होतेच; परंतु ' पेंडाम'चीही उकल होण्यास हेच धोरण मदतनीस ठरू शकते. देवळात जाण्यापूर्वी बाहेर पडवीत असलेल्या नंदीच्या वृषणाला हात लावून आत जाणारे उच्च लोक नंदीच्या वृषणाला पूज्य मानतात हेच सिद्ध करीत नाहीत काय ? मग पूज्यबुद्धीनेच एखाद्या आवडत्या वा जवळीक साधलेल्या प्राण्याचे ' गुद ' आदिवासींसारख्या पुराणसंस्कृतीच्या लोकांनी पूज्य वा देवतारूप मानून कुलचिन्ह निवडण्यात अशक्य ते काय आहे ?

खंडाते या आडनावाचाही अर्थ याच प्रकारे स्पष्ट करता येऊ शकतो. ' खांडुम ' या शब्दाचा अर्थ गोंडी भाषेत ' मांसाचा तुकडा ' असा आहे. खंडाते आडनावाच्या लोकांचे ' मांसाचा तुकडा ' वा ' मांस ' हे कुलचिन्ह असणे अशक्य नाही. देवदेवतांना यथेच्छ मांस अर्पण करून आनंदाचा जल्लोष करणारे आदिवासी मांसाना पूज्य मानू लागले तर ते नवल नाही. देवता-



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पिंत मांस प्रसाद म्हणून घरी बाळगणारा, त्यात अभिमान मानणारा किंवा असे मांस स्वसामर्थ्याने पारधवृत्तीतून प्राप्त करून देवतांना देणारा कुलसमूह 'मांसा'च्या नावावर प्रसिद्ध होऊ शकतो आणि तीच त्याची कुलचिन्हरूप ओळखण प्रचारात येऊ शकते.

### 'पाडवी' आणि त्यांचे कुलचिन्ह

गोंडांमधील एक उपजात प्रधान (परधान) गोंड म्हणून आहे, गोंड जमातीत त्यांना 'पाळा' असा शब्द आहे. 'ळा' चा 'डा' हा विपर्यय होऊन 'पाडाल' असे झाले असावे. 'पाडवी' आडनावाचे मूळ 'पाडाल' असे असावे, असा अंदाज आहे.

'पाड्डा' या शब्दाचा अर्थ कोलामी भाषेत गोन्ही किंवा कालवड असा आहे. तो जर या आडनावाशी संबंधित असा ठरला तर पाडवी आडनावाच्या लोकांचे कुलचिन्ह गोन्ही किंवा कालवड ठरते. संबंधित प्राण्यांशी कुलचिन्हाचे नाते लावणे हा जर आदिवासींचा विशेषच आहे; तर मग पाडवी कुळाच्या लोकांचे कुलचिन्ह 'पाड्डा' म्हणजे गोन्ही असणार हेही सुसंगतच म्हणावे लागेल!

'पद्दी' या शब्दाचा अर्थ डुकर किंवा वराह असा गोंडी भाषेत असून वराह ही अखिल हिंदूंची तर पूज्य देवता आहेच; पण आदिवासींना ती विशेष प्रिय आहे. कोलामांची 'जैतूर' नावाची देवता ही वराह देवताच असून गोंडात ती देवता 'पांढरा सेवर' म्हणून अत्यंत प्रिय आहे. दोन्ही जमातीत वराह-देवतेचे मोठे उत्सव होतात आणि डुकराच्या शिकारीचे वेड दोन्ही जमातींना आहे. तेंव्हा, एवढा महत्त्वपूर्ण प्राणी कुलचिन्हाच्या म्हणजे मूळ देवतेच्या रूपाने पाडवी या आडनावाच्या लोकांनी परंपरेने पूज्य मानला, यात संशय असू नये! 'पाड्डा' हा कोलामी शब्द पाडवी कुळाशी दूरान्वयाने कुलचिन्ह ठरविण्यासाठी कदाचित् जोडता येऊ शकला तरी 'पद्दी' शब्दाला दूरान्वयाची गरज नाही. म्हणून पाडवी या कुळाची ओळख 'पद्दी' या शब्दावरूनच करून घेणे अधिक इष्ट ठरेल.

### नमुन्यादाखल आडनावे

प्रस्तुत लेखात गोंडांची फार थोडी आडनावे चर्चेसाठी घेतली असून ती नमुन्यादाखल आहेत. आदिवासींच्या आडनावांच्या अनुषंगाने त्यांची कुलचिन्हे व मूळ कुलदेवता शोधण्यासाठी त्यांच्या इतर आडनावांचा अभ्यास पूरक व मनोरंजक ठरेल, यात शंका नाही.


## चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान

– लेखक –

प्रा. सदाशिव आठवले

किं. ३ रु.

मिळण्याचें ठिकाण –

चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई.

[जि. सातारा]










अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. व. दा. कुलकर्णी

# मराठी नासिक्य : वर्ण, ध्वनी आणि उच्चार*

मराठी नासिक्य उच्चाराच्या निर्णयाबाबत वैयाकरणात एकवाक्यता दिसून येत नाही. काहींनी त्यांना स्वर मानिले तर काही त्यांना व्यंजन मानितात. काहींना ही दोन्ही मते मान्य नसून त्यांनी त्यांना स्वरादी म्हटले आहे. काही ह्यांना स्वराश्रित मानितात. मराठीत अनुस्वार, अनुनासिक आणि सवर्गीय अनुनासिक यासाठी सामान्यतः बिंदू ( ं ) हे चिन्ह वापरले जाते. या लिखित चिन्हाच्या आधाराने त्याचे खणखणीत उच्चार आणि ओझरता उच्चार असे भेद केले आहेत. शिवाय अनुनासिक हे एक स्वतंत्र व्यंजन मानिले. अशाप्रकारे मराठीतील नासिक्य वर्णांची वैयाकरणांनी स्थूल मानाने व्यवस्था लाविली आहे. उच्चाराच्या दृष्टीने नासिक्य वर्णांचा जेव्हा भेद जाणवला तेव्हा तोही त्यांनी नमूद केला आहे. या सर्व व्यवस्थेत काही वैयाकरणांवर संस्कृत व्याकरण-व्यवस्थेचा प्रभाव दिसून येतो. इंग्रजीत व इंग्रजांसाठी व्याकरण लिहिल्याने मराठी व्याकरणव्यवस्था इंग्रजी व्याकरणव्यवस्थेशी जुळती करण्याचा काहींनी प्रयत्न केला आहे. मराठी व्याकरणात अशी सरमिसळ अनेक ठिकाणी दिसून येते.

परंपरागत दृष्टीने ङ् ञ् ण् न् म् या संकेतांनी ओळखली जाणारी अनुनासिके आणि ( ं ) या चिन्हाने व्यक्त होणारा अनुस्वार हे स्थूलमानाने नासिक्य वर्ण होत.

## वादाची पार्श्वभूमी आणि स्वरूप

### (१) स्वर, स्वरादी वा स्वराश्रित

रा. ब. दादोबा पांडुरंगाच्या मते अं आणि अः यांची संस्कृतात स्वर म्हणून निराळी गणना नसल्यामुळे मराठीतही निराळी मानण्याचे कारण नाही.[१] तसेच अनुस्वार आणि विसर्ग यांचा स्पष्टपणे व स्वतंत्रपणे उच्चार होत नसल्यामुळे त्यांना स्वर म्हणता येत नाही असे कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे मत आहे.[२] खेरांनी आपल्या Marathi grammar या पुस्तकात अं आणि अः यांना स्वतंत्र स्वर मानिले नाही. त्यांना जर स्वरात स्थान दिले तर निष्कारण इं इः; उं उः इत्यादींचीही स्वरांत गणना करावी लागेल अशी त्यांना भीती वाटते; म्हणून त्यांनी 'I have added the anuswara and visarga in the list of consonants. Both of them required the aid of vowels for a distinct pronunciation. Besides they are modified from the nasal consonants and र स etc respectively. The Anuswara may be considered as a nasal and visarga as a semi vowel.'[३] व्यंजनाप्रमाणेच अनुस्वाराचाही स्वराच्या आश्रयानेच उच्चार होतो. शिवाय किंचित फरकाने त्यांचा उच्चार म् न् इत्यादी नासिक्य व्यंजनांच्या उच्चाराप्रमाणेही होतो म्हणून त्यांना नासिक्य व्यंजन मानावे असा त्यांनी निर्णय दिला आहे. शास्त्रीय मराठी व्याकरणकार दामले यांनी (१) स्वर (२) स्वरादी (३) स्वरान्त किंवा व्यंजने असे वर्णमालेचे तीन प्रकार कल्पिले आहेत. खेरांच्या मताचा परामर्श घेण्यासाठी त्यांनी व्यंजन आणि स्वर; स्वर आणि व्यंजन तसेच $\frac{\text{अनुस्वार}}{\text{विसर्ग}}$

* [ मराठी स्वाध्याय-संशोधन मंडळ, उस्मानिया विद्यापीठ यात वाचलेला निबंध. ]

१ 'A grammar of the Marathi Language'
रा. ब. दादोबा पांडुरंग, मुंबई, १८८९ आवृत्ति ९ वी, पृ. ४.

२. 'मराठी व्याकरणावरील निबंध', कृष्णशास्त्री चिपळूणकर, पृ. ३३.

३. 'Marathi Grammar' Kher.
Introduction P. I, XV, XVI and the text pp. 16–17.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि स्वर; आणि स्वर $\frac{\text{अनुस्वार}}{\text{विसर्ग}}$ अशा जोडया मांडिल्या आहेत.

(१) क् + अ = क (२) अ + क् = अक्

(३) ं + अ = अ (४) अ + ं = अं

: + अ = अ अ + : = अः

व्यंजनाच्या पुढे स्वराची मदत हे लक्षण बिंदू व विसर्गास लाविता येत नसल्यामुळे 'स्वर आदि आहे ज्यामध्ये ते स्वरादि.'[१] अशी व्याख्या करून बिंदू व विसर्गाला त्यांनी स्वरादी म्हटले आहे. नासिक्य व्यंजन स्वरान्त मानून बिंदू द्वारे व्यक्त होणारा अनुस्वार हा स्वरादी आहे असे त्यांचे मत आहे. अनुस्वारांना जर खेरांच्या मतानुसार व्यंजन मानिले तर मराठीतील व्युत्पत्ती, विभक्ती आणि रूढी यांनुसार आलेल्या गहूं, दहीं, पाखरूं, तळें, असतां, करावें, करूं इत्यादींना व्यंजनान्त शब्द मानावे लागल्याची आपत्ती ओढवेल अशी शंका आल्यामुळे 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' या न्यायाचा आधार घेऊन अशा शब्दांना व्यंजनान्त शब्द मानू नये असा आपला निर्णय दिला आहे. बिंदूना स्वरादी मानून त्यांचे (१) खणखणीत आणि (२) ओझरता असे उच्चार मानावेत हा महत्त्वाचा निर्णय त्यांनी प्रस्थापिला. दामल्यांच्या या व्यवस्थेवर सबनीसांनी चांगलाच हल्ला चढविला. सबनीसांनी दामल्यांप्रमाणेच बिंदूला केवळ उच्चाराची खूण मानिली आहे. परंतु स्वतंत्र वर्णाचे त्याला स्थान दिले नाही. बिंदू हा कधी कधी विशिष्ट वर्णाचा किंवा अनुस्वार अनुनासिकाचा उच्चार असतो अशावेळी त्याला परसवर्ण म्हणतात व त्याचा उच्चारही वेगळा म्हणजे खणखणीत होतो. ज्यावेळी तो केवळ उच्चार असतो त्यावेळी तो नाकातून होतो म्हणून त्याला अनुनासिक म्हणावे असे ते म्हणतात.[२]

## (२) सवर्गीय नासिक्य

(अ) अनुस्वाराचा उच्चार ज्या वर्गातील वर्ण त्यापुढे असेल त्या त्या वर्गातल्या शेवटल्या वर्णाप्रमाणे होतो हा नियम कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी सर्वशः लाविला आहे.[३] पाश्चात्य पंडित J. R. Firth यानीही हाच नियम मराठीतील नासिक्य उच्चारास लाविला आहे.[४] (हे कसे चूक आहे ते पुढे दर्शविण्यात येईल.) परंपरागत दृष्टीने जवळ जवळ सर्वांनीच क् च् ट् त् प् या वर्गातील वर्णापूर्वी येणारे ङ् ञ् ण् न् म् ही सवर्गीय अनुनासिके मानिली आहेत.

(ब) य् ल् व् यांना यँ् लँ् आणि वँ् असे सवर्गीय अनुस्वार खेरांनी मानिले. परंतु र् ष् श् स् आणि ह् यांच्या आधी येणारे अनुनासिक दंतौष्ठ्य वँ् असून त्याला त्या त्या वर्णाचे सवर्गीय अनुनासिक का मानू नये असा सवाल टाकिला आहे.[५]

दामल्यांनी "बिंदूच्या पुढे स्पर्श व्यंजनांपैकी कोणतेही व्यंजन आले असता त्या बिंदूचा उच्चार, पुढील व्यंजन ज्या वर्गातील असेल त्या वर्गातील अनुनासिका-

१. 'शास्त्रीय मराठी व्याकरण', मो. के. दामले, पृ. १९.

२. 'आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण,' महादेव पांडुरंग सबनीस पृ. ७२, २४०, २४१.

३. 'मराठी व्याकरणावरील निबंध,' कृष्णशास्त्री चिपळूणकर, पृ. ३३.

४. Nasals and nasalization in the Sanskritic Languages raise fundamental questions of phonetic and phonological theory, and also problems for Roman Transcription.. Let us take Marathi for instance. In initial position. there is a three term nasal alterance, but immediately proceeding another consonant, especially one is possible, the nasal homorganic with the following consonants. — J. R. Firth.

"Phonological features of some Indian Languages." Proceedings of the second International Congress Phonetic Sciences; Cambridge, 1936, PP. 180–81.

५. 'Marathi grammar', Kher, PP. 15–19.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रमाणे होतो. " असा नियम सांगितला तर लगेच टीपेत "पुढील वर्गातील अनुनासिकाप्रमाणेच ( खण-खणीत उच्चार ) होतो असा नाही; तर केवळ ओझरताही होतो. "[१] अशी पुस्ती जोडली आहे. य् र् ल् व् श् ष् स् ह् ही व्यंजने बिंदूच्या पुढे आली तर बिंदूचा उच्चार खणखणीत होतो असे ते मानितात. य् किंवा ल् ही व्यंजने बिंदूच्या पुढे आली तर बिंदूचा उच्चार अनुक्रमे तालव्य यँ् किंवा दंत तालव्य लँ् असा होतो. परंतु व् र् श् ष् स् ह् ही व्यंजने पुढे आली असता दंत तालव्य वँ् असा होतो असे ते म्हणतात. वँ् हा दंत तालव्य आणि लँ् हाही दंत तालव्य उच्चार मानल्यामुळे दोन्ही दंत तालव्य उच्चारातील फरक लक्षात येणे मात्र कठीण आहे. पण हे यँ् लँ् वँ् हे अनुस्वार आहेत असे एक वेळ मानावे तर, ' हे अनुक्रमे अनुनासिक होत, असे म्हणण्यास हरकत नाही. '[२] असे जेव्हा ते म्हणतात तेव्हा मात्र पुन्हा संभ्रम निर्माण होतो.

वँ् ' हा उच्चार संस्कृत तत्सम शब्दात नेहमीच आढळतो आणि निव्वळ मराठी शब्दातही आढळतो. जसे जवं, तवं, आम्हांला, डांस, घांस, कांसव, ऊंस, भोंसकणें इत्यादि ' आणि बिंदूच्या पुढे य् र् श् ष् स् ह् ही व्यंजने आलेल्या निव्वळ मराठी शब्दांची उदाहरणे उपलब्ध नाहीत असे त्यांच्या मताप्रमाणे मानावे तर लगेच दुसऱ्या टीपेत ते म्हणतात ' निव्वळ मराठी शब्दांत बिंदूच्या पुढे ल् व् स् ही व्यंजने आली असता बिंदूचा अनुनासिक उच्चार होतो. ' यासाठी निव्वळ मराठी शब्दांची जी उदाहरणे दिलीत ती वरील शब्दांचीच आहेत.

बिंदूच्या ओझरत्या उच्चारास अनुनासिक म्हणतात असे एका ठिकाणी मांडिले तर खणखणीत उच्चारही अनुनासिक व्यंजनाप्रमाणे होतो असे दुसऱ्या ठिकाणी प्रतिपादितात.[३]

सारांश, बिंदू या खुणेचा (१) खणखणीत उच्चाराचा अनुस्वार (२) ओझरत्या उच्चाराचा अनुस्वार आणि (३) खणखणीत उच्चाराचे अनुनासिक (४) ओझरत्या उच्चाराचे अनुनासिक अशी विभागणी केल्यामुळे हा घोटाळा निर्माण झाला असावा.

W. S. Allen यांनी अनुस्वारास गौण ध्वनी ( Subordinate Sound ) मानिले आहे. तसेच श् ष् स् ( ह् ) या आधी येणारा नासिक्य वर्ण संस्कृतात अनुस्वार असतो असे प्रतिपादिले आहे.[४]

जेव्हा आपण मराठी वर्णमालेतील वर्णांचा केवळ उच्चाराच्या दृष्टिकोणातून विचार करू लागतो तेव्हा आपल्या अभ्यासाचे क्षितिज विस्तारले आहे याचा प्रत्यय येतो.

मराठी ही संस्कृतोद्भव भाषा असल्यामुळे संस्कृत भाषेतील नासिक्य वर्णव्यवस्था मराठीत अपरिहार्यपणे येणे स्वाभाविक आहे, प्रश्न आहे तो फक्त प्रमाणाचाच.

## मराठीतील नासिक्य वर्ण

आजच्या सर्वमान्य मराठीत ङ् ण् न् म् म्' न्' आणि ण्' अशी सात अनुनासिके आहेत. याशिवाय ' ं '[५] चिन्हाने व्यक्त होणारा एक अनुनासिक स्वर असे एकूण आठ ध्वनिग्राम मानिले आहेत. या व्यवस्थेत ञ् हा स्वतंत्र अनुनासिक वर्ण मानिला नाही. वर्णमालेतून तो गाळला आहे तसेच म्' न्' ण्' हे नवीन अनुनासिक वर्ण मानिले आहेत. ञ् हा वर्ण का गाळण्यात आला आणि वरील नवीन तीन वर्ण का समाविष्ट करण्यात आले यांची कारणे त्या त्या अनुनासिकांचा विचार करताना देण्यात येतीलच. प्रथमतः अनुनासिक म्हणजे काय याची कल्पना स्पष्ट व्हावी. ' मुख नासिका वचनोऽनुनासिकः ' अशी अनुनासिकाची व्याख्या आहे.[६] ' नाकाच्या पोकळीतून हवा ज्यावेळी

१. ' शास्त्रीय मराठी व्याकरण ', मो. के. दामले, पृ. ३६-४१

२. तत्रैव.

३. तत्रैव.

४. ' Phonetics in Ancient India ' W. S. Allen PP. 39-46.

५. टीप :- बिंदू ं ही खूण मुद्दाम स्वीकारली नाही कारण बिंदूभोवती आपली जी कल्पनांची वलये आहेत त्यात अजून भर पडेल ही शंका.

६. पाणिनीय सूत्र, संज्ञाप्रकरणम् १.१.८.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तोंडाकडे येते त्यावेळी मृदुतालूच्या टोकाला असणारा लिबलिबीत भाग खाली लोंबत असतो पण प त ट क ब द ड ग या स्फोटकांच्या उच्चारांच्या वेळी तो मागच्या बाजूने वर जाऊन नाकाची पोकळी आणि घसा यांना सांधणारे प्रवेशद्वार बंद करतो हे प्रवेशद्वार बंद नसले तर फुफ्फुसातून तोंडात येणारी हवा थोडीशी नाकाच्या पोकळीतही शिरते आणि त्या ठिकाणी एक प्रकारचा नाद उत्पन्न होतो. हा नाद एखाद्या ध्वनिबरोबर झाला म्हणजे तो ध्वनी अनुनासिक आहे असे म्हणतात.'[१]

आपण ज्यास अनुस्वार म्हणतो तो मराठीत नाही. मराठीत आहे तो अनुनासिक स्वर ( Nasalization ) स्वर + अनुस्वार मराठीत नाहीत. स्वर आणि नासिक्य ध्वनी हे एकमेकांशी पूर्णतः एकरूप झालेले आढळतात आणि स्वराच्या उच्चाराचा जोपर्यंत कालावधी असतो तोपर्यंतच या नासिक्य-ध्वनीचा कालावधी असतो.

संस्कृतात पूर्वी अनुस्वाराचा नेमका उच्चार कसा होता हे आज सांगणे अशक्य आहे. प्राचीन भाषा-शास्त्रज्ञांनी अनुस्वाराचे उच्चारण स्थान केवळ नासिकाच दर्शविले आहे. आधुनिक भारतीय भाषांत अनुस्वार उपलब्ध नाही. डॉ. बाबूराम सक्सेना यांचे अनुस्वारासंबंधीचे अनुमान असे की 'शब्दकी ध्वनियोंके मौखिक उच्चारण के उपरान्त नासिका–विवरसे जो शेष श्वास स्वतंत्र ( और आपेक्षिक दृष्टिसे पूर्वापार ध्वनियोंसे असंबद्ध ) रूपसे निकलती थी, वही अनुस्वार था ।'[२] ऐमेनोने संस्कृत भाषेतील अनुस्वारास स्वतंत्र ध्वनिग्राम मानिले आहे. अनुस्वार आणि अनुनासिक व्यंजन या ध्वनिग्रामातील पृथगात्मता दाखविण्यासाठी जी उदाहरणे त्यांनी दिली आहेत त्या विषयी ते स्वतःच साशंक आहेत.[३] शिवाय प्राचीन भाषाशास्त्रज्ञांनी अनुस्वाराचे उच्चारण स्थान केवळ नासिकाच दर्शविले आहे आणि काही विशिष्ट स्थितीत नासिक्य व्यंजनांच्या जागी अनुस्वाराच्या उच्चाराची मोकळीक दिली असल्याने तसेच सवर्गीय व्यंजनांच्या सान्निध्यात येऊन होणारा अनुस्वाराचा उच्चार, विवर्गीय व्यंजनाच्या सान्निध्यात आल्याने होणारा अनुस्वाराचा उच्चार, वेगवेगळ्या प्रकारचा असल्याने तत्कालीन अनुस्वाराचा उच्चार कसा होतो हे सांगणे अशक्य आहे. ऐमेनोचे अनुस्वाराच्या ध्वनिग्रामासंबंधीचे मत खोडून काढण्यात आले आहे.[४] जिज्ञासूंनी ते मुळातूनच पाहणे अधिक बरे! मराठी भाषेच्या प्रकृतीच्या दृष्टीने विचार केल्यास अनुनासिक स्वर हा एक स्वतंत्र ध्वनिग्राम मानावा लागेल. डॉ. अशोक रा. केळकरांनी तो मानिलाही आहे.[५] परंतु गुजराथी भाषेच्या प्रकृतीच्या दृष्टीने विचार करून डॉ. पी. बी. पंडितांनी म् न् ण् या नासिक्य ध्वनिग्रामाशिवाय **न** हा अनुनासिक ङ् ञ् आणि इतर नासिक्य उच्चारासाठी संदेहध्वनिग्राम ( Archiphoneme ) मानिला आहे.[६] परंतु मराठीत ही व्यवस्था मानण्याचे काहीही प्रयोजन नाही.

सारांश, वर दर्शविल्याप्रमाणे मराठीत सात अनुनासिक व्यंजने आणि एक अनुनासिक स्वर असे एकूण आठ नासिक्य ध्वनिग्राम आहेत. मराठीत

१. 'भाषा आणि संस्कृति' ना. गो. कालेलकर, पृ. १६.

२. 'सामान्य भाषा विज्ञान', बाबूराम सक्सेना, पृ. ६२

३. " Nasal phonemes of Sanskrit " E. B Emeneau. Lg. vol. 22, 1946. PP. 86–93.

४. " हिंदी ( और संस्कृत ) मे अनुस्वार और नासिक्य व्यंजन " रमेशचंद्र महरोत्रा, मध्यभारती, सागर विश्वविद्यालय, वर्ष २, अंक २, १९५९, पृ. ७५–८४.

५. 'Nasality may be treated as a co-occurant property with vowels and can be abstracted as a separate phoneme.' Dr. A. R. Kelkar. " Phonology and Morphology of Marathi." Ph. D. Dissertation Cornall University, 1958. (unpublished.)

६. " Nasalization, aspiration and murmur of Gujarathi." Dr. P. B. Pandit. Indian Linguistics, 17, 1957, pp. 165–72.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ङ् ण् न् म् म्' न्' ण्' आणि ٧ या नासिक्य ध्वनिग्रामांची वितरण व्यवस्था खालीलप्रमाणे आहे.*

(१) ध्वनिग्राम | रूपध्वनी | स्थान
/म्/ [म्] द्वयौष्ठ्य

| वितरण | उदाहरणे |
|---|---|
| i सर्व स्थितीत | मन्, समाज्, काम् |
| ii मध्यस्थानी सवर्गीय नासिक्य प् फ् ब् भ् | सम्प, गुम्फा, आम्बा, कुम्भार इ. |

iii आणि विवर्गीय स्पर्श वर्णाबरोबर
ट् ट् ड् क् ख् ग् घ् च् ज्
ण् न् ज् स् र् ल् य् व् इत्यादी

उदा. अम्का, शिम्गा, चम्चा, आम्टी, दम्डी, उम्दा, गम्जा, आम्सूल, सम्राट, आम्ल, साम्य्, जम्वा, टोम्णा, निम्न, इ.

iv द्वित्व — सम्मत

(२) /न्/ [न्] दन्त्य–

| | |
|---|---|
| i सर्वस्थितीत | नात, मनात, मन |
| ii मध्यस्थानी सवर्गीय नासिक्य त् थ् द् ध् | कान्त, पन्थ उन्दीर, आन्धळा इ. |

iii मध्यस्थानी, विवर्गीय वर्णाबरोबर
क् ख् ग् घ् प् ब् म् स् र्
ल् य् व् इत्यादी

उदा. झुन्का, तन्खा, वन्स्, किन्रा, भान्गड, चिन्मय, अन्य, अन्वय, आन्ला इ.

iv द्वित्व — कदान्न इ.

(२/१) /न्/ [नं] पश्चदन्त्य — केवळ मध्यस्थानी सवर्गीय स्पर्श वर्णाबरोबर

उदा. चिन्च, पंच, गंज पांझण, वांझ, सांज, झांज इ.

×

(२/२) /न्/ [न] वर्त्स्य

i केवळ मध्यस्थानी संचार, संजय इ. सवर्गीय स्पर्श वर्णाबरोबर
ii मध्यस्थानी, विवर्गीय घर्षक श् बरोबर

उदा. आन्शापोटी, अंशी (८०)

(३) /ण्/ [ण्] परिवेष्टित–

| | |
|---|---|
| i केवळ मध्य व अन्त्यस्थानी | पाणी, मण् |
| ii मध्यस्थानी, सवर्गीय नासिक्य ट् ठ् ड् ढ् | तंटा, मंठा दंडा. पांढरा इ... |

iii मध्यस्थानी विवर्गीय स्पर्श वर्णाबरोबर
क् ख् ग् द् ब् म् य् व् प् इ.

उदा. ठण्का, कण्खर, कण्गी, नण्देचा, कुण्बी, मृण्मय, गण्पत, पुण्य, कण्व इ.

iv द्वित्व — अण्णा, विषण्ण्

(४) /ङ्/ [ङ्] कोमल तालव्य–

i केवळ मध्य व अन्त्यस्थानी शंका, पतंग
ii मध्यस्थानी सवर्गीय नासिक्य
क् ख् ग् घ्

उदा. शंका, शंख, भांगड, आंघोळ इ.

iii मध्यस्थानी, विवर्गीय पण केवळ म् न् नासिक्याबरोबर व तेही संस्कृत शब्दात

उदा. वाङ्मय, दिङ्नाद, वाङ्निश्चय इ.

(४/१) /ङ्/ [ञ्] तालव्य मध्यस्थानी केवळ य् बरोबर संयम्, संयोग इ.

(४/२) /ङ्/ [वँ] ओष्ठ्यदन्त्य — इतरत्र
र् ल् व् श् स् ह् आणि संयुक्त व्यंजन ज्ञ

उदा. वारंवार, संलग्न, किंवा, अंश, संसार, मांस, सिंह, संज्ञा इ.

---

* जेथे उच्चारण स्पष्टपणे दाखविता येणे शक्य नाही तेथे परंपरागत लिपिचिन्हे स्वीकारली आहेत.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ वँ ] या बाबतीत अधिक स्पष्टीकरण करणे आवश्यक आहे.*

( ५,६,७, ) म्' न्' ण्' यांना महाप्राण नासिक्य ध्वनिग्राम मानिले आहे.

( ५ ) i । म् । । म्' । आदि आणि मध्यस्थानी-
मण, म्हण, ताह्मण

( ६ ) ii । न् । । न्' । आदी आणि मध्यस्थानी-
नात न्हात
उन्हाळा पन्हाळा

( ७ ) iii । ण् । । ण्' । केवळ मध्यस्थानी-
कणेरी कण्हेरी

यांना ध्वनिग्राम का मानिले यासाठी ही पृथगात्म वितरण व्यवस्था दिली आहे. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही की महाप्राण नासिक्य अन्त्यस्थानी कधीच येत नाही. म्हणूनच अनेकांना प्रश्न पडतो की यांना महाप्राण मानावे की संयुक्त व्यंजन ? वितरण व्यवस्थेत ते नासिक्य वर्ण म् न् शी पृथक होतात । मात । । नात । । न्हात ।. ण् ' शी पृथगात्मता अगदीच अल्पप्रमाणात मिळते परंतु नासिक्य वर्ण हे मराठीत सघोष असल्यामुळे सघोष वर्णांशी देखील वितरण व्यवस्थेत ते पृथक होतात. उदा. । भात । । न्हात ।, । धान । । न्हान ।, । भार । । म्हार ।, । घात । न्हात । इ...

भ् ध् घ् इ.... ध्वनींचे ब् + ह्, द् + ह, ग् + ह् असे निरनिराळे अवयव पाडता येत नाहीत. ते एकसंघ ( unit ) ध्वनी आहेत, परंतु काही वेळा न् + ह्, म् + ह् असे अवयव पडू शकतात. या कारणामुळे त्यांना काही ध्वनिवैज्ञानिक महाप्राण मानण्यास तयार नाहीत. ते त्यांना संयुक्त व्यंजन मानितात. असेच जर मानायचे झाले तर ख् धू म् घ् ट् ढ् यांनाही संयुक्त व्यंजन मानावे लागेल. काही ध्वनिवैज्ञानिकांनी तसे मानिलेही आहे.[१] परंतु या व्यवस्थेमुळे अधिकच गोंधळ माजेल. मराठीच नव्हे तर आधुनिक भारतीय भाषांच्या प्रकृतीच्या ते विरुद्ध आहे. यासाठी क् च् ट् त् प् या वर्गातील अनुक्रमे सघोष आणि अघोष महाप्राण जसे आपण मानितो त्याचप्रमाणे नासिक्य महाप्राण हा एक स्वतंत्र वर्ग मानावा. शिवाय मराठीत नासिक्य व्यंजने नेहमीच सघोष आहेत.

येथपर्यंत नासिक्य उच्चाराचा आणि त्याचे संयुक्त व्यंजनातील प्रथम अवयव या दृष्टीने विचार केला. संयुक्त व्यंजनातील द्वितीय अवयव या दृष्टीने विचार केल्यास खालील संयोग आढळतात.

( १ ) प् त् ड् क् ग् च् स् श् र् + म्

( २ ) प् त् द् क् ग् स् श् र् ह् + न्

( ३ ) ट् ठ् ड् ढ् ख् र् श् + ण्

अशा प्रकारची संयुक्त व्यंजने होत असल्यामुळे तो चर्चेचा विषय होण्याचे कारण नाही.

म्' न्' ण्' ही महाप्राण नासिक्य संयुक्त व्यंजनातील प्रथम अवयव म्हणून येणे हे मराठीतच काय तर इतर भारतीय भाषांच्या प्रकृतीच्या विरुद्ध आहे. परंतु यामुळे त्यांच्या ध्वनिग्रामत्वाला ( Phonemic status ) बाध येण्याचे काहीही कारण नाही.

### ञ् चा उच्चार

मराठीतील काही नासिक्य उच्चारासंबंधी स्पष्टीकरण करणे आवश्यक आहे. मराठीत ञ् हा तालव्य नासिक्य उच्चार मराठीतील सर्व परिचित वर्णमालेतील ञ् आणि केवळ य् च्या संयोगाने येतो.

ध्वनिवैज्ञानिकांनी त्याच्या मर्यादित वितरण व्यवस्थेमुळे संस्कृतमध्येही ञ् हा ध्वनिग्राम मानिलेला

* ( १ ) जरी वँ या उच्चाराचे स्थान ङ् या उच्चाराच्या स्थानाजवळ नसले तरी वँ ला ङ् चा रूपध्वनी मानिला आहे, कारण वितरण व्यवस्थेत र् ल् व् श् स् ह् ज्ञ् आणि य् यापूर्वी ङ् कधीच येत नाही.

( २ ) [ ञ् ] आणि [ वँ ] यांच्या ठिकाणी अर्धस्वराचे गुण असल्यामुळे / ᷈ / अनुनासिक स्वर ध्वनिग्रामाचे ध्वनिसाधर्म्यामुळे रूपध्वनी मानिता आले असते. परंतु ञ् हा केवळ य् या अर्धस्वरापूर्वीच येतो आणि वँ हा अर्धस्वर व् पूर्वी, स्पंदित र्, पार्श्विक ल्, घर्षक श्, स्, ह् आणि संयुक्त व्यंजन ज्ञ् यापूर्वी येत असल्यामुळे ङ् या कोमल तालव्य नासिक्य ध्वनिग्रामाचाच रूपध्वनी मानणे अधिक श्रेयस्कर होय.

१. i 'Manual of Phonology' Dr. Charles F. Hockett
ii 'Phonology and Morphology of Marathi.'
– Dr. A. R. Kelkar.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाही.[1] हिंदीमधील ञ् हा न् मध्ये लुप्त झाला आहे.[2] आधुनिक अभ्यासकांनीही ञ् या उच्चाराबाबत हिंदी व मराठीसाठी हाच निर्वाळा दिला आहे.[3]

यू च्या संयोगाने येणारा हा उच्चार मराठीतील कोणत्याही ध्वनिग्रामाच्या पृथगात्म वितरण व्यवस्थेत न आल्यामुळे आणि मराठीतील च (पश्चदन्त्य) आणि च़ (वर्त्स्य) आणि या वर्गातील ध्वनींशी स्पर्शदृष्ट्या साधर्म्य नसल्यामुळे ञ् ला स्वतंत्र ध्वनिग्राम मानिता येत नाही. वितरण व्यवस्थेत दर्शविल्याप्रमाणे कोमल तालू व तालू स्थानदृष्ट्या एकमेकाशी जवळ असल्यामुळे । ङ् । या ध्वनिग्रामाचा तो रूपध्वनी मानिला आहे.

**वँ चा उच्चार**

सवर्गीय अनुस्वार आणि सवर्गीय अनुनासिक असे भेद खेरांनी केले आहेत हे मागेच दर्शविले आहे. य् व् ल् या आधी येणारा नासिक्यध्वनी हा सवर्गीय अनुस्वार असून र् ष् श् स् आणि ह् या आधी येणाऱ्या नासिक्य उच्चारास दंतौष्ठ्य अनुनासिक ते मानितात हेही मागे दर्शविले आहे. 'यवलपरे यवला वा' हे सूत्र संस्कृत भाषेच्या व्यवस्थेच्या दृष्टीने योग्य असेल पण मराठीस ते तंतोतत लागू पडेलच असे नाही. महत्त्वाचे म्हणजे अनुस्वाराच्या संबंधात आलेले ते सूत्र आहे.

'अनुनासिका नु नासिका भेदेन यवला द्विधा' यानुसार अनुनासिक हा भेद जरी संस्कृतात दर्शविला असला तरी मराठीत तो स्पष्टपणे शिल्लक राहिला आहे असे वाटत नाही.

मराठीत र् ल् व् श् स् ह् आणि संयुक्त व्यंजन ज्ञ् यापूर्वी आलेला नासिक्य ध्वनी (वँ) दंतौष्ठ्यच होतो असेही म्हणता येणार नाही. ण् न् म् हे ध्वनिग्राम र् ल् व् श् ष् स् ह् या ध्वनिग्रामापूर्वी येतात. त्यामुळे ओष्ठ्य दन्त्य (Labio Dental Nasal) वँ हा ण् न् म् यांचा रूपध्वनी मानिता येत नाही. स्थान-दृष्ट्या वँ हा ङ् ला जवळ नाही. परंतु वितरणव्यवस्थेत ङ् हा क् वर्ग आणि म् न् ह्या व्यतिरिक्त व्यंजनांच्या पूर्वी वा नंतर येत नसल्यामुळे आणि वँ हा र् ल् व् श् स् ह् आणि ज्ञ् याशिवाय इतरत्र व्यंजनाच्या पूर्वी वा नंतर येत नसल्यामुळे ङ् या ध्वनिग्रामाचा तो रूपध्वनी मानिला आहे.

ङ् ण् न् म् हे वितरणव्यवस्थेत दाखविल्याप्रमाणे आणि ध्वनिग्रामाचे त्यांना स्थान असल्यामुळे निराळी चर्चा करण्याचे कारण नाही.

**च व च़ चे उच्चार**

प्रातिशाख्यात च़ चा तालव्य उच्चार मानिला आहे. परंतु आधुनिक भारतीय भाषात त्याचे स्पर्श-स्थान बदलेले आहे.[4] मराठीत तर पश्चदन्त्य (च)

---

१. "Nasal Phonemes of Sanskrit." E. B. E. B. Emeneau. Lg. Vol. 22, 1946, PP. 86-93.

२. "हिंदी (और संस्कृत) मे अनुस्वार और नासिक्य व्यंजन" मध्यभारती, सागर विश्व-विद्यालय, वर्ष २ अंक २, १९५९ पृ. ७५-८४, रमेशचंद्र महरोत्रा.

३. i 'The Segmental Phonemes of Contemporary Hindi' Thesis presented to the University of Texas, June 1963, P. 144. R. Prakash Dixit. (Unpublished)

ii 'Phonology and Morphology of Marathi' Dr. A. R. Kelkar Ph. D. Dissertation, Cornell University, 1958. (Unpublished)

iii 'The Pronunciation of Marathi.' A. LLoyd James and S. G. Kanhere, BSOAS IV, 1928 P. 793.

४. i "Bengali Phonetics" S. K. Chatterji, BSOAS II, 1921, PP. 1-25.

ii 'Phonology and Morphology of Marathi' Dr. A. R. Kelker.

iii "The pronunciation of Marathi" A LLoyd James. and S. G. Kanhere, BSOAS IV, 1928, PP. 793. 94.

iv 'Marathi Language Course' Mrs. Lambert.






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे नवीनच स्पर्शस्थान आले आहे. च़ हा त् + स् यांचे बनलेले संयुक्ताक्षर आहे असे ध्वनिवैज्ञानिक मानितात. मराठीतील च किंवा च़ हे अनुक्रमे स्पर्शदन्त्य व्यंजन आणि पश्चदन्त्य घर्षक किंवा स्पर्शदन्त्य व्यंजन आणि वर्त्स्य घर्षक यांचे संयुक्ताक्षर ( Affricate ) नसून तो एकसंघ ( unit ) ध्वनी आहे. हिंदीतही तो एकसंघ ध्वनी मानिला आहे.[१]

मराठीत च ( पश्चदन्त्य ) आणि च़ ( वर्त्स्य ) आणि त्या वर्गातील इतर उच्चार स्पर्श व्यंजने आहेत. आधुनिक ध्वनिवैज्ञानिक च हा त् आणि स् चा संयुक्त उच्चार मानितात हे वरच दर्शविले आहे. त्यास त्यांनी ( Affricate ) ही संज्ञा दिली आहे. परंतु मराठीतील च आणि च़ किंवा त्या वर्गातील उच्चारात स् या घर्षकाचे अत्यंत अल्पस्वरूपात घर्षण दिसून येते. म्हणून मराठीत ती अनुक्रमे पश्चदन्त्य आणि वर्त्स्य अशी स्पर्श व्यंजने आहेत. डॉ. कालेलकरांनी 'ध्वनिविचारात' अनुक्रमे दन्त्य आणि तालव्य तर 'भाषा आणि संस्कृतीत' दन्त्य आणि दंतमूलीय ( वर्त्स्य ) अर्धस्फोटक मानिली आहेत.[२] कसेही जरी मानिले तरी त्याआधी येणारा नासिक्य. ध्वनि सवर्गीय अनुनासिक होतो आणि त्याचे वितरण त्या वर्गापुरतेच मर्यादित असल्यामुळे ते पश्चदन्त्य अनुनासिक आणि वर्त्स्य अनुनासिक होत. स्पर्शस्थानाच्या दृष्टीने दन्त्य न् ला ती अधिक जवळची असल्याने / न् / या नासिक्यध्वनिग्रामाचे ते [ नं ], ×
[ न् ] रूपध्वनी होत.

## ण्' न्' म्' यांचे उच्चार

ण्' न्' म्' याना घ् ढ् झ् ध् भ् या सघोष महाप्राणाप्रमाणेच महाप्राण नासिक्यध्वनिग्राम मानिले आहे. वस्तुतः ण्' न्' आणि म्' यांची वितरण व्यवस्था मर्यादित आहे. काही ध्वनिवैज्ञानिक ख् थ् भ् घ् ध् इत्यादिकांना महाप्राण व्यंजने न मानिता त्याना संयुक्त व्यंजन मानितात. (पृ. ३३ तळटीप १) उलट काही ध्वनिवैज्ञानिक त्यांना संयुक्त व्यंजन न मानिता एकसंघ ( unit ) ध्वनी मानितात.[३]

ण्' न्' म्' या महाप्राण नासिक्याबद्दल एवढे सांगितले तरी पुरे की मराठीत नासिक्य हे नेहमी सघोष असल्यामुळे वितरण व्यवस्थेत सघोष स्पर्श व्यंजनाशी ते पृथक होतात आणि ण् न् म् यांच्याशी परस्पर पृथगात्म वितरण असल्यामुळे त्यांना स्वतंत्र ध्वनिग्राम मानिले आहे. एव्हढे मात्र खरे की ण्' हा ण् प्रमाणेच आदी कधीही येत नाही तसेच ण्' न्' आणि म्' यांचे परस्पर पृथगात्म वितरण मर्यादितच आहे; म्हणून त्यांना स्वतंत्र ध्वनिग्राम मानू नये असे मात्र म्हणता येणार नाही. नासिक्यमहाप्राणाचा तो एक वर्ग कल्पावा म्हणजे पुरे.

एकंदरीत हे विवेचन थोडक्यात अशारीतीने मांडता येईल.

( १ ) मराठीत एकंदर आठ नासिक्य ध्वनिग्राम आहेत.

i सात अनुनासिक व्यंजने.

ङ् ण् न् म् ण्' न्' म्'

ii एक अनुनासिक स्वर ँ ( सर्व स्वरांसाठी )

---

१. ' Segmental Phonemes of Contemporary Hindi. '
R. Prakah Dixit; See ' A Note on Affricate. '

२. i ' ध्वनि विचार ' ना. गो. कालेलकर, पृ. ४४.
ii ' भाषा आणि संस्कृति ' ना. गो. कालेलकर, पृ. ३८.

३. " The Phonemes of Bengali " Charles A. Furgusion and Monier Chowdhari, Lg. 36, 1960, PP. 22–59.

ii " Aspirates in Standard Bengali " Mohamed Abdul Hai, Indian Linguistics, 19, Turner Jubilee Vol. I, 1958, PP 142–46.

iii " The duration of consonants is not affected by aspiration. They display the same duration on spectrum; "
' The Segmental Phonemes of Contemporary Hindi '
– R. Prakash Dixit.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(१) / ङ् / या कोमल तालव्य ध्वनिग्रामाचे

[ङ्] कोमल तालव्य

[ञ्] तालव्य

[वँ] ओष्ठ्य दन्त्य

हे रूपध्वनी आहेत.

(२) / ण् / परिवेष्टित नासिक्य ध्वनिग्राम

(३) / न् / दन्त्य नासिक्य ध्वनिग्राम

[न्] दन्त्य नासिक्य

[नं] पश्चदन्त्य नासिक्य

×

[न्] वर्त्स्य नासिक्य

हे रूपध्वनी आहेत.

(४) / म् / द्वयोष्ठ्य नासिक्य ध्वनिग्राम

(५) / म्ʼ / द्वयोष्ठ्य महाप्राण नासिक्य ध्वनिग्राम

(६) / न्ʼ / दन्त्य महाप्राण नासिक्य ध्वनिग्राम

(७) / ण्ʼ / परिवेष्टित महाप्राण नासिक्य ध्वनिग्राम

अशी सात अनुनासिक व्यंजने आहेत तसेच एक अनुनासिक स्वर / ँ / असे एकूण आठ नासिक्य ध्वनिग्राम मराठीत आहेत.

साहजिकच प्रश्न निर्माण होतो की अशा या प्रकारच्या वर्णनात्मक अभ्यासाने काय साधले जाणार आहे. उत्तर देणे थोडेसे कठीण आहे. उत्तराचा शोध घेत असताना मराठीतील नासिक्य उच्चार कोणकोणते आहेत हे प्रथमतः जाणून घेतले पाहिजे. नासिक्य ध्वनिग्रामांची वितरण व्यवस्था कशा प्रकारची आहे हेही जाणून घेतले पाहिजे; आणि मला वाटते, वरील विवेचनावरून याची थोडीफार कल्पना आली असेल.

अनुस्वार, अनुनासिक, परसवर्ण तसेच बिंदू ह्या खुणेचा (१) खणखणित उच्चाराचा अनुस्वार (२) ओझरत्या उच्चाराचा अनुस्वार (३) खणखणित उच्चाराचे अनुनासिक (४) ओझरत्या उच्चाराचे अनुनासिक यामुळे उच्चाराच्या प्रक्रियेत तसेच लिखाण व्यवस्थेत निर्माण झालेला विस्कळितपणा थोडा फार तरी कमी व्हावा हा ह्या वर्णनात्मक अभ्यासाचा प्रमुख उद्देश आहे. मराठीत तर व्युत्पत्तीने येणारे अनुस्वार, विभक्तीने येणारे अनुस्वार, रूढीने येणारे अनुस्वार, उच्चारित अनुस्वार, अनुच्चारित अनुस्वार तसेच तोकड्या उच्चारासाठी येणारी आणि अनेकवचन दर्शविण्यासाठी येणारी बिंदू ही एकच खूण असल्यामुळे विचारात गोंधळ न निर्माण झाला तरच नवल ! अशा प्रकारच्या अभ्यासाने तो गोंधळ कितपत कमी होईल हे नक्की सांगता येणार नाही. परंतु आधुनिक ध्वनि-विज्ञानाच्या साह्याने हे संकेत पारखून घेतले तर कार्य पुष्कळच सुकर होईल हे निश्चित. आधुनिक ध्वनि-विज्ञानाच्या शास्त्रीय बैठकीवरून मराठीतील नासिक्य उच्चार, त्यांची स्थाने, उच्चारातील भेद, नासिक उच्चार आणि वर्णमालेतील इतर वर्णांशी त्यांचा परस्पर संबंध आणि महत्त्वाचे स्पष्टता आणि सुलभता या दृष्टीने पाहू गेल्यास आपले विचार अधिक स्पष्ट व्हावेत आणि पुढील अभ्यासाची ती नांदी ठरावी ही अपेक्षा आहे.

मराठीतील नासिक्य उच्चारांचा अगदी थोडक्यात आढावा घेण्याचा या निबंधात* अत्यंत अल्प प्रयत्न केला आहे. उच्चाराचा लिपीशी घनिष्ट संबंध आहे. स्वर यंत्रातून निघालेले सारेच ध्वनी भाषेत उपयोगिले जात नाहीत; भाषेत उपयोगिले जाणारे सारेच ध्वनी मराठी भाषेत उपयोजिले जातात असे नाही, आणि उपयोजिलेल्या सर्वच ध्वनींना लिपि-संकेत देता येतातच असेही नाही, हे केवळ अशक्य आहे. तरीपण भाषेतील विद्यमान उच्चाराची ओळख होणे आवश्यक आहे. ती लिपिबद्ध कशी करावयाची हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे आणि तो या निबंधाच्या कक्षेबाहेरचा असल्याने विचारात घेतला नाही.

* [ डॉ. श्री. रं. कुलकर्णी, मराठी विभाग प्रमुख, उस्मानिया विद्यापीठ यांचे मार्गदर्शन आणि प्रोत्साहन या अभ्यासाची प्रेरक शक्ती होय. प्रा. भा. शं. कहाळेकर आणि भाषाविज्ञान विभागातील प्राध्यापक एन्. अनंत नारायण यांनी चर्चा करून वेळोवेळी केलेल्या उपयुक्त सूचनांबद्दल त्यांचा ऋणी आहे. डॉ. स. गं. मालशे, संचालक, मराठी संशोधन मंडळ, मुंबई, यांनी केलेल्या सक्रिय साहाय्याबद्दल त्यांचे आभार. ]



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## संदर्भ


ग्रंथ

( १ ) A Grammar of the Marathi Language – रा. ब. दादोबा पांडुरंग

( २ ) मराठी व्याकरणावरील निबंध – कृष्णशास्त्री चिपळूणकर

( ३ ) Marathi Grammar – खेर

( ४ ) शास्त्रीय मराठी व्याकरण – मो. के. दामले

( ५ ) आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण – महादेव पांडुरंग सबनीस

( ६ ) भाषा आणि संस्कृति – ना. गो. कालेलकर

( ७ ) ध्वनिविचार – ना. गो. कालेलकर

( ८ ) लघुसिद्धांत कौमुदी – सं. रामचंद्र दत्तात्रय किंजवडेकर

( ९ ) सामान्य भाषा विज्ञान – बाबूराम सक्सेना

(१०) Phonetics in Ancient India – W. S. Allen

(११) Phonology and Morphology of Marathi ( unpublished ) – Dr. A. R. Kelkar

(१२) The Segmental phonemes of Contemporary Hindi. ( unpublished) – R. Prakah Dixit.

(१३) A manual of Phonology – Charles F. Hockett.

(१४) Marathi Language Course – Mrs. Lambert.

निरनिराळ्या मासिकातील संशोधनपर लेख

(१५) " Phonological features of Indian Languages " *Proceedings of The Second International Congress of Phonetic Sciences, Cambridge*, 1936, J. R. Firth.

(१६) " Nasalization, aspiration and Murmur of Gujrathi " Dr. P. B. Pandit. – *Indian Linguistics*, 17, 1957.

( १७ ) " Nasal Phonemes of Sanskrit " E. B. Emeneau *Lg. Vol. 22*, 1946.

(१८) " The Pronunciation of Marathi " A LLoyd James and S. G. Kanhere, *BSOAS IV*, 1928.

(१९) " Bengali Phonetics " S. K. Chattergi, *BSOAS II*, 1921.

(२०) "The Phonemes of Bengali" Charles A. Fergusions and Maniar Choudhari *Lg 36*, 1960.

( २१ ) " Aspirates in standard Bengali " Mohamad Abdul Hai, *Indian Linguistics*, 19 Turner Jubilee Vol. I, 1958.

(२२) " हिन्दी ( और संस्कृत ) मे अनुस्वार और नासिक्य व्यंजन " मध्यभारती, सागर विश्व-विद्यालय, वर्ष २ अंक २, १९५९ रमेशचंद्र महरोत्रा.


### पारिभाषिक शब्द

| | |
|---|---|
| प्रयत्न | Manner of Articulation |
| स्थान | Place of Articulation |
| व्यंजन | Consonant |
| स्वर | Vowel |
| अर्धस्वर | Semi Vowel |
| नासिक्य | Nasal |
| स्पर्श | Stop or Plossive |
| प्रवाही | Continuants |
| सघोष | Voiced |
| अघोष | Voiceless |
| घर्षक | Spirants ( Fricatives ) |
| पार्श्विक | Laterals |
| स्पंदित | Rolled or Trill |
| महाप्राण | Aspiration |
| अल्पप्राण | Non-Aspiration |
| कंठ्य | glottal |
| कोमल तालव्य | Velar |
| तालव्य | Palatal |



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

| | |
|---|---|
| परिवेष्टित | Retroflex |
| वर्त्स्य | Dento-Alveolar |
| पश्चदन्त्य | Post-Dental |
| दन्त्य | Dental |
| द्वयोष्ठ्य | Bilabial |
| अनुनासिक स्वर | Nasalization |
| सवर्गीय अनुनासिक | Homo organic nasal |
| विवर्गीय अनुनासिक | Non-Homoorganic nasal |
| ध्वनिग्राम | Phoneme |
| रूपध्वनी | Allophone |
| ओष्ठ्य दन्त्य | Labio-dental |
| संयुक्ताक्षर | Affricate |
| वितरण व्यवस्था | Distribution |
| पृथगात्म वितरण व्यवस्था | Contrast in distribution |
| द्वित्व | Gemition |
| संयुक्त व्यंजन | Cluster |
| आदि, मध्य, अन्त्य | Initial, medial, final. |
| संदेह ध्वनिग्राम | Archiphoneme |
| स्वर संयोग | Dipthong. |

## स्वर

इ उ
ए औ
अॅ अ ॅआ
आ

ऐ आणि औ

स्वर संयोग

## नासिक्य ध्वनिग्राम

| | कोमल तालव्य | परिवेष्टित | दन्त्य | द्वयोष्ट्य |
|---|---|---|---|---|
| अल्पप्राण | ङ् | ण् | न् | म् |
| महाप्राण | | ण्’ | न्’ | म्’ |

(१) सात नासिक्य व्यंजने
(२) अनुनासिक स्वर

एकंदर आठ नासिक्य ध्वनिग्राम



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## मराठी व्यंजन ध्वनिग्राम

| | प्रयत्न | | | स्थान | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | व्यंजने | | | कंठ्य | कोमल तालव्य | तालव्य | परि-वेष्टित | वर्त्स्य | दन्त्य: पश्चदन्त्य | दन्त्य: दन्त्य | द्व्योष्ठ्य |
| स्पर्श | अघोष | | अल्पप्राण | | क् | | ट् | च् | च् | त् | प् |
| | | | महाप्राण | | ख् | | ठ् | छ् | | थ् | फ् |
| | सघोष | | अल्पप्राण | | ग् | | ड् | ज् | ज् | द् | ब् |
| | | | महाप्राण | | घ् | | ढ् | झ् | झ् | ध् | भ् |
| | नासिक्य | | अल्पप्राण | | ङ | | ण् | | | न् | म् |
| | | | महाप्राण | | | | ण्' | | | न्' | म्' |
| | घर्षक | | | ह् | | | | श् | स् | | |
| प्रवाही | पार्श्विक | | अल्पप्राण | | | | ळ् | | | ल् | |
| | | | महाप्राण | | | | | | | ल् | |
| | स्पंदित | | अल्पप्राण | | | | | | र् | | |
| | | | महाप्राण | | | | | | र् | | |
| | अर्धस्वर | | | | | य् | | | | | व् |



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ले. भाई मानवेन्द्रनाथ रॉय
अनुवादक–श्री. वा. रं. सुंठणकर

# बुद्धी, प्रेरणा व क्रांती

[ भाई मानवेन्द्रनाथ रॉय यांच्या ' Reason Romanticism and Revolution ' या ग्रंथाचा भाग १ याचा मराठी अनुवाद बेळगावचे श्री. वा. रं. सुंठणकर यांनी केला असून तो महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाच्या वतीने प्रसिद्ध व्हावयाचा आहे. या ग्रंथातील पहिले प्रकरण नवभारताच्या वाचकांकरिता येथे उद्धृत केले आहे –कार्यकारी संपादक. ]

तत्त्वज्ञानाचा इतिहास हा जगाचा इतिहास आहे, असे हेगेल याने म्हटले होते. त्याचाच शिष्य मार्क्स याने आपल्या गुरूचे हे विधान फिरविले आणि घोषणा केली की संस्कृतीचा इतिहास हा वर्गयुद्धाचा इतिहास आहे. इतिहासशास्त्रासंबंधी परस्पर विसंगत दिसणारी ही दोन तत्त्वे प्रस्थापित झाल्याला एक सबंध शतक होऊन गेले आहे, या दोहोतील विसंगती वरकरणी आहे, कारण हेगेल आणि मार्क्स या दोघांच्याही मताप्रमाणे इतिहास ही स्वतःच्या गतिमत्तेमुळे उलगडत जाणारी विकासाची प्रक्रिया आहे. ही विसंगती बाह्य स्वरूपाची असल्यामुळे या दोन तत्त्वांसंबंधीचा वाद अद्याप मिटला नाही, समबुद्धीच्या विचारवंतांनासुद्धा यापैकी कोणताही एक दृष्टिकोण मान्य करणे कठीण वाटते.

मार्क्सच्या आधीच्या पिढीत होऊन गेलेला इतिहासकार मिशले ( Michelet ) याने इतिहासशास्त्राचा स्वतंत्रपणे एक वेगळा सिद्धान्त मांडला. त्या सिद्धान्तात परस्परविरोधी वाटणाऱ्या या दोन तत्त्वांचा मिलाफ घडून आला आहे. इतिहासाच्या सांप्रदायिक मतामुळे मिशलेचे समाधान होत नव्हते. फ्रेंच राज्यक्रांतीचा हा भावी इतिहासकार शास्त्र म्हणून इतिहास लिहिण्याची नवी पद्धती शोधीत होता. भाषांच्या उत्पत्तीचा अभ्यास करणाऱ्या भाषाशास्त्राच्या साह्याने गतेतिहासाची गुपिते उकलणे सुलभ होईल अशी कल्पना त्याला सुचली. इतिहासशास्त्रातील समस्यांचा भाषाशास्त्राच्या दृष्टिकोणातून विचार केला पाहिजे, या कल्पनेमुळे इतिहास व तत्त्वज्ञान एकमेकात गुंफलेले आहे, या निर्णयाप्रत तो येऊन पोहोचला. ' विश्वेतिहास ' या अपुऱ्या राहिलेल्या आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत इ. स. १८३० मध्ये त्याने लिहिले होते की, " जगाच्या प्रारंभापासून जो संग्राम सुरू झाला आहे तो जगाच्या अंताबरोबरच मिटणार आहे. आणि हा संग्राम म्हणजे मानव विरुद्ध निसर्ग, चित् विरुद्ध जड, स्वातंत्र्यवाद विरुद्ध प्रारब्धवाद यांच्यातील संग्राम आहे. कधीही न संपणाऱ्या या संग्रामाचा आलेख म्हणजे इतिहास होय. "

मिशलेने इतिहासाचे नवे शास्त्र तयार करण्याच्या प्रयत्नाचा प्रारंभ केला. तत्पूर्वी शंभर वर्षे नेपल्समध्ये रोमन कायद्याचा एक अप्रसिद्ध शिक्षक गिआंबतिस्ता व्हिको याने एक प्रबंध लिहिला होता. या प्रबंधाचा मथळा असा होता :– " देशोदेशींच्या स्वभावधर्मांचे निरूपण करणाऱ्या नव्या विज्ञानाची मूलतत्त्वे आणि त्यातून दिग्दर्शित होणारी लोकसमूहाच्या निसर्गकायद्याची नवी तत्त्वे. " मिशलेला व्हिकोच्या रूपाने समानधर्मा सापडला. इतिहासविषयक संशोधनाची एक नवी वाट पाडण्यात व्हिको हा अग्रेसर होता. त्याच्या प्रबंधाला त्याकाळी विशेष प्रसिद्धी लाभली नव्हती. त्या प्रबंधाचे मध्यवर्ती सूत्र असे होते की " मानव्य हे मानवाची स्वतःचीच निर्मिती आहे. " ज्ञात इतिहासातील घटना यथार्थतेने समजून घ्यावयाच्या असतील, तर मूलारंभात जाऊन त्या समजून घेतल्या पाहिजेत; या पद्धतीवर भर देऊन व्हिकोने " सामाजिक जग हे निश्चितपणे मानवाचेच कर्तृत्व आहे, हे अबाधित सत्य" प्रस्थापित केले. या अबाधित सत्याचा अनुषंजक म्हणजे " खुद्द मानवी बुद्धीच्या परिवर्तनात तिची मूलतत्त्वे शोधता येतात. "








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इ. स. १८३० सालच्या जुलई क्रांतीच्या काळात, धगधगणाऱ्या ज्वालांच्या सांनिध्यात बसून मिशले आपला ग्रंथ लिहीत होता. मानवशास्त्र, भाषाशास्त्र, आणि समाजशास्त्र यांच्या साहाय्याने ऐतिहासिक संशोधन करण्याची व्हिकोची पद्धती पाहून मिशले स्तिमित झाला होता. त्याने स्वतःच वर्णन केल्याप्रमाणे "व्हिकोच्या महान् ऐतिहासिक मूलतत्त्वांच्या उन्मादाने तो विलक्षण भारावून गेला होता." इतिहास आणि तत्त्वज्ञान ही युगायुगामधून एकमेकात कशी गुंतली गेली आहेत हा त्याचा सिद्धान्त विशद करण्यासाठी त्याने हाती घेतलेला 'विश्वेतिहास' हा ग्रंथ पूर्ण करायला त्याला पुरेसे आयुष्य लाभले नाही. पण त्याने एवढे घोषित करून ठेवले की "भाषा, साहित्य, इतिहास, वास्तवशास्त्र, गणित, तत्त्वज्ञान, हे परस्परांपासून अगदी भिन्न वाटणारे विषय वस्तुतः संलग्न असतात. किंबहुना त्या सर्वांची मिळून एक पद्धती तयार होत असते."

मार्क्सने आपल्या गुरूला पायावर उभे केले खरे. पण त्यामुळे इतिहासाचा सुसंघटित दृष्टिकोन तयार झाला असे नव्हे. मार्क्स आणि एंगल्स या दोघांनीही मिशलेचे ग्रंथ वाचले होते. व्हिकोच्या कल्पनाही त्यांना अपरिचित नव्हत्या. व्हिकोचे 'नवविज्ञान' जरी नेपल्समध्ये जन्मले होते तरी लायब्नीझ, वूल्फ, हर्डर, गट इ. पंडित आणि तत्त्ववेत्ते यांच्या द्वारे ते जर्मनीतील विद्यापीठात जाऊन पोहोचले होते. हर्डरला "मानव जातीच्या इतिहासाच्या तत्त्वज्ञानाविषयी कल्पना" हा आपला ग्रंथ लिहिण्यापूर्वी व्हिकोचा परिचय झाला होता. एवढेच नव्हे तर हेगेलच्या इतिहासाच्या तत्त्वज्ञानातसुद्धा व्हिकोचा प्रभाव आढळून आल्याशिवाय राहात नाही.

व्हिकोने फ्रान्सिस बेकनचे ग्रंथ वाचले होते. व्हिकोचे 'नवविज्ञान' ही बेकनच्या "नोव्हम आर्‌गॅनम्" या ग्रंथाची केलेली सरळ चोरी अशी टीका करायलाही काही काही कठोर टीकाकारांनी मागेपुढे पाहिले नाही. ही टीका खोडसाळ असली तरी बेकनच्या संशोधनाच्या साच्यात व्हिकोचे ग्रंथ तयार होत होते एवढे मात्र खरे निसर्ग घटनांच्या अभ्यासासाठी बेकनने विगमन पद्धतीचा अवलंब केला होता. तीच पद्धती मानवज्ञातीच्या इतिहासाला लागू करण्याची कल्पना व्हिकोने बेकनपासूनच घेतली. ग्रोतिअस या पंडिताने सर्व देशांना लागू करता येण्यासारखे सामान्य नियम शोधण्यासाठी इतिहास, ईश्वरविज्ञान आणि तत्त्वज्ञान यांचा भाषाशास्त्रीय अभ्यास केला होता. ग्रोतिअसच्या ग्रंथांचा अभ्यास केल्यामुळे इतिहासाचे सामान्य नियम शोधण्यासाठी तशाच प्रकारच्या पद्धतीचा अवलंब करण्याची कल्पना व्हिकोला सुचली. तात्पर्य, विचारांच्या गतिमानतेचा मागोवा घेता घेता आपण अगदी प्राचीन काळच्या महान विचारवंतांपर्यंत जाऊन पोहोचतो.

विचारांची हीच साखळी आधुनिक काळात तपासून पाहता, आपण सॅव्हिग्नी या लेखकापर्यंत येऊन पोहोचतो. व्हिकोचा कायदेशास्त्राविषयीचा सिद्धान्त आणि आपला स्वतःचा सिद्धान्त यांच्यातील साम्य सॅव्हिग्नीने मान्य केले आहे. इ. स. १८३७ साली प्रसिद्ध झालेल्या इतिहासाच्या तत्त्वज्ञानावरील हेगेलच्या व्याख्यानांच्या प्रस्तावनेत पूर्वी ज्या विचारवंतांनी हा विषय हाताळला होता त्यांचा नामनिर्देश करताना हर्डर आणि श्लेगेल यांच्या बरोबरीने व्हिकोचा उल्लेख आहे. इ. स. १८८४ साली 'विश्वकायदा' या व्हिकोच्या ग्रंथाचा अनुवाद जर्मनभाषेत प्रसिद्ध झाला. त्याच्या प्रस्तावनेत या इटलीच्या इतिहासकाराने शंभर वर्षांपूर्वी मांडलेल्या सिद्धान्ताचे हेगेलच्या विचारसरणीशी कसे साम्य आहे हे दर्शविण्यात आले होते. तसेच, रूसो हा या दोघांतील दुवा असण्याचीही शक्यता आहे. कारण 'नवविज्ञान' ज्यावेळी अखेरच्या स्वरूपात प्रसिद्ध झाले त्यावेळी रूसोचे वास्तव्य व्हेनिसमध्ये होते. रूसोने लिहिलेल्या भाषांच्या उत्पत्तीविषयींच्या प्रबंधावरून असे अनुमान काढता येते की भाषाशास्त्राच्या साहाय्याने समाजाच्या उत्पत्तीच्या समस्येचा उलगडा करता येतो ही कल्पना रूसोने व्हिकोपासून घेतली होती. तेव्हा हेगेलवर व्हिकोच्या विचारांची छाप रूसोच्या द्वारे पडली असणे अगदी संभवनीय आहे.

"मानव स्वतःचा इतिहास घडवितो हे सूत्र मार्क्स आणि एंगल्स यांनी व्हिकोपासून–बहुधा प्रथम मिशलेच्या द्वारे आणि मागाहून खुद्द व्हिकोच्या ग्रंथावरून–घेतले असावे, असे दिसते. या सूत्राच्या आधाराने त्यांचा









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ऐतिहासिक जडवाद[1] रचला गेला ......... व्हिकोने प्रत्यक्षात जे प्रतिपादन केले त्याच्याही पलिकडे ऐतिहासिक जडवाद जातो. पण व्हिकोच्या मार्क्सवादी भाष्यकारांच्या मते त्या दिशेने व्हिकोने बरीच वाटचाल केली होती. "[2]

इतिहासाच्या मार्क्सप्रणीत जडवादी कल्पनेला पद्धतशीर स्वरूप देणारा लॅब्रीओला हा पहिला लेखक होता. त्याच्या प्रबंधात मार्क्सचा पूर्वसूरी म्हणून त्याने व्हिकोला मान्यता दिली आहे. त्यानंतर पॉल लाफार्ग याने स्पष्टपणे असे दाखवून दिले की, इतिहासाच्या मार्क्सप्रणीत दृष्टीचा माग काढता काढता लुई मॉर्गनच्या द्वारे थेट व्हिकोपर्यंत पोहोचता येते. मार्क्सने पूर्ववयात व्हिकोच्या ग्रंथांचे परिशीलन केले होते. लासलेने ' नव-विज्ञान ' न वाचल्याबद्दल मार्क्सने इ. स. १८६१ मध्ये आश्चर्य व्यक्त केले होते. रोमन कायद्याचा आत्मा विशद करतांना व्हिकोने दाखविलेली तत्त्वज्ञानाची धारणा पाहून मार्क्सने त्याचे कौतुक केले होते. ' कॅपिटल ' ग्रंथात एके ठिकाणी तळटीपेत मार्क्सने व्हिकोचे एक अवतरण दिलेआहे. ते असेः– " मानवाचा इतिहास आणि निसर्गाचा इतिहास ( सृष्टिज्ञान ) ( Natural History )[3] यांच्यातील भेदाचे रहस्य हेच आहे की, मानवाचा इतिहास हा त्याने स्वतः घडविलेला असतो पण निसर्गाच्या इतिहासाचे तसे नसते. " व्हिकोच्या ग्रंथांचे सूक्ष्म परिशीलन केल्यानंतर सॉरेल अशा निर्णयाप्रत आला की, " विचार हे उत्पादन पद्धतीची फलिते असतात; या मार्क्सप्रणीत तत्त्वाची पूर्वसूचना व्हिकोने प्रतिपादन केलेल्या विचार-जननाच्या नियमात सापडते. " क्रोचेने व्हिकोची परंपरा मार्क्स-वादापर्यंत कशी येऊन भिडते हे स्पष्टपणे दाखविले आहे. " वर्गयुद्ध आणि मनाच्या प्राथमिक अवस्थेत आणि नव्या जंगली अवस्थेत पुनः पुनः परतण्याने समाजाचे पुनरुज्जीवन या व्हिकोच्या दोन्ही कल्पना मार्क्स आणि सॉरेल यांनी परिपक्व केल्या. "[4]

यावरून दिसून येईल की या सर्वांमधून विचाराच्या विकासाची एक अखंड शृंखला सांधली गेली असून हेगेलचा विरोधविकासवाद किंवा मार्क्सचा आर्थिक नियतिवाद हे दोन्ही या विकासक्रमात चपखल बसू शकत नाहीत. त्यातही मार्क्सच्या इतिहासाच्या तत्त्व-ज्ञानापेक्षा हेगेलचे इतिहासाचे तत्त्वज्ञान या विकास-क्रमाला अधिक जुळणारे आहे. बेकन आणि हॉब्ज यांच्या परंपरेत व्हिको तयार झाला असला तरी त्याने इतिहासाचे जे नवे तत्त्वज्ञान मांडले ते निसर्गाच्या कायद्याची चिकित्सा करूनच मांडले. तथापि त्याला श्रमजीवी वर्गाच्या क्रांतीचा विचारप्रवर्तक असे मानता येत नाही. व्हिको हा कॅथॉलिक पंथी होता. त्या पंथाच्या पकडीतून तो सुटू शकत नव्हता. " मानव्य ही मानवाची स्वतःची निर्मिती आहे. पण केवळ ईश्वर हाच सर्व

१. कार्ल मार्क्सची इतिहासविषयक मीमांसा ' ऐतिहासिक जडवाद ' ( Historical Materialism ) या नावाने ओळखली जाते. तिलाच आर्थिक नियतिवाद असेही म्हणतात. मार्क्सच्या इतिहासमीमांसेचे मुख्य सूत्र म्हणजे इतिहास हा भौतिक कारणामुळे–दैवी किंवा निसर्गातीत कारणामुळे नव्हे–घडत असतो. अस्ति-त्वच जाणिवेला कारणीभूत होत असते. समाजाची उत्पादनाची साधने जशी असतात त्याला अनुसरूनच समाजाचे मंदिर उभे असते. उत्पादनाच्या शक्ती समाजरचना आणि वर्गसंबंध यांच्या बदलाला कारणीभूत असतात. समाजाच्या किंवा समाजाच्या एका गटाच्या आर्थिक संघटना आणि आर्थिक घडामोडी यांच्या प्रभावाने त्या समाजाच्या राजकीय, नैतिक, धार्मिक, कायदेशीर, बौद्धिक, सांस्कृतिक इ० जीवनाच्या अंगांची वाढ होत असते, असा मार्क्सच्या मीमांसेचा इत्यर्थ आहे. समाजातील घडामोडी आणि त्यांचा विकास हे आर्थिक कारणामुळे नियत होतात अशी ती मीमांसा सांगते म्हणून तिला ' आर्थिक नियतिवाद ' असेही म्हणतात.

२. Introduction to the ' Autobiography of Giambattista Vico ' Cornell University Press, 1944.

३. पूर्वी प्राणी, वनस्पती, खनिज पदार्थ आणि इतर नैसर्गिक वस्तु यांचे वर्णन, वर्गीकरण आणि अध्ययन करणाऱ्या शास्त्राला निसर्गाचा इतिहास Natural History ( सृष्टिज्ञान ) म्हणून संबोधीत असत. त्यात प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, खनिजशास्त्र यांचे त्याकाळी उपलब्ध असलेले ज्ञान यांचा समावेश होत असे.

४. Benedetto Croce, The Philosophy of Giambattista Vico.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्रेष्ठ आहे " अशी त्याची निष्ठा होती. अशा अंतर्विरोधी कल्पनांपासून तो मुक्त होऊ शकत नव्हता. इतके असूनही निःसंदिग्धपणे धर्मविरोधी आणि नास्तिकवादी अशी मार्क्सची इतिहासमीमांसा त्याने पूर्वसूचित केली होती यात शंका नाही.

जडवाद हा मार्क्सवादी पद्धतीचा गाभा आहे. पण जडवादाची[१] उत्पत्ती काही मार्क्सबरोबरच झाली नाही. जडवाद हा मानवी विचाराइतकाच जुना आहे. प्राथमिक अवस्थेतील बुद्धिवादाने माणसाला देवांना शरण जायला लावले. मानवाचे हे जे मूळचे पतन झाले त्याविरुद्ध बंडाचा सर्वात पहिला उठाव म्हणजे तत्त्वज्ञानाचा जन्म होय. त्यावेळेपासून तहत आजपावेतो तत्त्वज्ञानाला स्वतःची अशी म्हणजे स्वतंत्र गतिमत्ता आलेली आहे.

अंतिमतः इतिहास म्हणजे मुक्त होण्यासाठी मानवाने चालविलेल्या धडपडीचा आलेख होय. मानवाचा सामाजिक विकास हा त्याच्या जैविक उत्क्रांतीच्या वरच्या पातळीवरची विकासाची पुढची अवस्था आहे. या वरच्या पातळीवर जीवनार्थ कलहाचे स्वरूप अधिक प्रभावी होण्यासाठी जीवन सामुदायिक आणि सहकारात्मक होत असते. म्हणून इतिहास ही एक सुसंघटित विकासात्मक प्रक्रिया आहे.

इतिहास ही युक्त अशी विकासात्मक प्रक्रिया आहे, हे जाणणारा ॲरिस्टॉटल हा पहिला विचारवंत होय. इतिहासाची ही सुसंघटित कल्पना पुढे स्टोईक[२] पंथीयांनी उचलली. एकेकाळी या पंथाचा पगडा साऱ्या यूरोपवर बसला होता. अखेरीस, सेंट ऑगस्टीन याने प्रतिपादन केलेल्या ईश्वरविज्ञानाच्या[३] प्रभावाखाली ती कल्पना आली. त्यानंतर एक सहस्रकाचा काळ पीठपंडिती वादाच्या ( Scholasticism )[४] वर्चस्वाचा गेल्यानंतर रेनासान्सच्या काळातील थोर व्यक्तींनी

---

१. जडवाद ( Materialism ) जडद्रव्य हेच अंतिम सत्य आहे असे मानतो. जडाच्या साहाय्याने विश्वातील घडामोडीचे स्पष्टीकरण करता येते असे हा वाद सांगतो. वस्तूचे मूळ कणात असते असे सांगणारा कणवाद हे याचे उदाहरण आहे. जडवाद आत्म्यालाही हे तत्त्व लागू करतो. जडवाद्यांची मनाची कल्पना अशी की, मेंदू ज्या कणांचा बनलेला असतो त्यांच्या अतिशय गुंतागुंतीच्या आणि सूक्ष्म गतीत मनाचा उगम आहे. जडकारणामुळे-आध्यात्मिक किंवा नैतिक कारणामुळे नव्हे-मानवाच्या सामाजिक घडामोडी घडतात असे जडवाद सांगतो. उदा. मार्क्सचा ऐतिहासिक जडवाद. थोडक्यात म्हणजे जडवादाप्रमाणे जडद्रव्य, त्याच्या हालचाली आणि फेरबदल यांच्या शिवाय दुसऱ्या कशाचे अस्तित्व नसते.

२. हा पंथ प्राचीन ग्रीसमध्ये इ. स. पूर्व ३०८ च्या सुमारास होऊन गेलेल्या अथेन्सच्या झेनो या तत्त्ववेत्त्याने स्थापन केला. या पंथाला ' स्टोईक ' नाव पडण्याचे कारण असे की झेनो हा अथेन्समधील ' स्टोआ ' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सभास्थानात प्रवचने देत असे. जग हा देव-मनाचा आविष्कार आहे या सर्वेश्वरवादी मताचे ते होते. साऱ्या सत्यवस्तू जडात्मक असून आत्मा हा जडाचे उदात्त स्वरूप आहे; जग दैवी शहाणपणाची कृती असून निसर्गकायद्याने त्याचे नियमन होते म्हणून भवितव्यात जे असेल ते पत्करणे हे मानवाचे कर्तव्य असते अशी त्यांची विचारसरणी होती. या पंथाचे वैशिष्ट्य म्हणजे सुखदुःखाची पर्वा न करता संयमाने आचरण करणे आणि नीतिनियम कडकपणे पाळणे हे होय. त्यावरून कडक नीतीचे आचरण करणारा तो ' स्टोइक ' हा अर्थ प्रचारात आला. या पंथाच्या विचारप्रणालीला ' स्टोइकवाद ' म्हणतात.

३. ईश्वरविज्ञान हा Theology याचा प्रतिशब्द. देवासंबंधीचे शास्त्र असा त्याचा अर्थ आहे. हे शास्त्र प्रामुख्याने खिस्तधर्मी असून देवाचे स्वरूप आणि त्याच्या उपाधी देवाचा मानवाशी आणि विश्वाशी असणारा संबंध, मानवाची देवाविषयीची कर्तव्ये इ. गोष्टींचे विवेचन करतो.

४. पीठपंडितवाद हा यूरोपीय खिस्ती संस्कृतीतील एक महत्त्वाचा वाद आहे. यूरोपात मध्ययुगात जी विद्येची पीठे ( Schools ) होती त्यात तर्कशास्त्र, अध्यात्म आणि ईश्वरविज्ञान यांचे अध्ययन चालत असे. या पीठातील पंडितांना Schoolmen म्हणत असत. त्यांच्या तत्त्वप्रणाली ( Scholasticism ) पीठपंडितवाद हे नाव पडले. त्यांचा काळ इ. स. १००० ते १५०० आहे. त्यांचे तत्त्वज्ञान खिस्ती धर्मगुरु आणि ॲरिस्टॉटल व त्यांचे भाष्यकार यांच्या प्रामाण्यावर आधारलेले होते. त्यांचा पहिला मौलिक विचारवंत जॉन



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मानवाच्या प्रगतीकडे पाहाण्याच्या बुद्धिवादी दृष्टिकोणाचे पुनरुज्जीवन केले. इतिहासाच्या या वाटचालीवरून हेच दिग्दर्शित होते की बुद्धिवाद आणि अद्भुतरम्यवाद हे दोन समान्तर चालणारे विचारप्रवाह असून त्यांच्या संयोगाने इतिहासाची घडण होत असते. खुद्द रेनासान्सच्या काळातील अद्भुतरम्यवाद्यांचे म्हणणे असे की "प्रबोधनाच्या दोन युगांना वेगळा करणारा कॉन्स्टंटाईन ते कोलंबस यांच्या दरम्यानचा दीर्घ कालखंड म्हणजे केवळ भयाण पोकळी होती असे मानणे हास्यास्पद आहे. उलटपक्षी, याच नव्हे तर दुसऱ्या प्रत्येक युगात घटनांच्या बाह्य स्वरूपाच्या गर्भात एकच प्रक्रिया संथपणे सतत चालू असते हे जाणणे आवश्यक आहे."[१]

(खरोखरीचा ॲरिस्टॉटल एकच होऊन गेला असला तरी) ऐतिहासिक दृष्ट्या दोन ॲरिस्टॉटल होऊन गेले असे म्हटले पाहिजे. 'अध्यात्मशास्त्र'[२] 'तर्कशास्त्र' या ग्रंथांचा कर्ता एक ॲरिस्टॉटल आणि 'राज्यशास्त्र' आणि 'नीतिशास्त्र' यांचा कर्ता हा दुसरा ॲरिस्टॉटल. पहिला ॲरिस्टॉटल मध्ययुगीन खिस्ती ईश्वरविज्ञानाचा प्रमाणभूत तत्त्ववेत्ता समजला जातो. दुसरा ॲरिस्टॉटल अरबी पंडितांनी त्याचा पुनरुद्धार करीपर्यंत विस्मृतीत गाडला गेला होता.

---

स्कॉटस एरिजिना हा होता. त्यानंतरचे मुख्य प्रवक्ते अल्बर्टस मॅग्नस, थामस अक्विनास आणि डन्स स्काटस हे तेराव्या शतकात होऊन गेले. त्यांच्या तत्त्वज्ञानाचे वैशिष्ट्य म्हणजे धार्मिक पोथितत्वांना न सोडता धर्म आणि तत्त्वज्ञान, श्रद्धा आणि बुद्धि यांची क्षेत्रे पृथक ठेवणे हे होते. त्यांच्या प्रयत्नामुळेच ईश्वरविज्ञानात, धर्मचर्चेत ॲरिस्टाटलचा द्वंद्ववाद आणि बुद्धी यांना स्थान प्राप्त झाले. त्यानी बुद्धी आणि प्रकटीकरण यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला. युरोपीय तत्त्वज्ञानाला त्यांच्या तीन देणग्या होत्याः– १ व्यक्तित्वाचा सिद्धांत. २. त्याला अनुरूप असा राज्यसंस्थेचा सिद्धांत आणि ३. सुसंगत राजकीय तत्त्वज्ञान.

१. F. J. C. Hearnshaw, The Science of History.

२. या अनुवादात Metaphysics ला अध्यात्मशास्त्र आणि Philosophy ला तत्त्वज्ञान असे प्रतिशब्द उपयोजिले आहेत. पूर्वीच्या काळी Metaphysics हा शब्द सामान्यतः Philosophy या अर्थीही वापरत असत. पण अर्वाचीन काळात ते भिन्न अर्थी वापरले जातात. Metaphysics या शब्दाचा मूळ अर्थ वास्तव शास्त्राच्या पश्चात् किंवा पलीकडे ( Meta = After, Beyond आणि Phylics = वास्तवशास्त्र) असा होतो. ॲरिस्टाटलने आपल्या तत्वचिंतनात्मक ग्रंथाला Metaphysics हे नाव दिले होते. प्रारंभी हे शास्त्र वस्तुतत्व शास्त्राशी ( Ontology ) समरूप समजत असत. पण पुढे अस्तित्व, वस्तुद्रव्य, दिक्, काल, सत्य, ज्ञान, कार्यकारण भाव, इत्यादींच्या मूल तत्वांचे चिंतन या अर्थी ते रूढ झाले. Metaphysics ची सर्वसामान्य व्याख्या "वस्तूंच्या अमूर्त अव्यक्त अशा स्वरूपाचा त्यांचे यादृच्छिक गुण, त्यांचे संबंध आणि जडत्व यांचा संदर्भ सोडून विचार करणारे शास्त्र." अशी करण्यात येते. या शास्त्रात अनुभववादाव्यतिरिक्त केवळ चिंतनात्मक विचार असतो आणि वास्तव आणि अवास्तव यांच्या चिकित्सेतील विरोध अंतर्भूत असतो. या शास्त्रात प्रामुख्याने पुढील विषय येतातः– विश्वाचे आदितत्व, आदिकारण, विश्वाचा निर्माता आणि नियंता, त्याचे अस्तित्व, स्वरूप, त्याचा आविष्कार, दृश्य सृष्टीमागील अंतिम सत्य, अंताच्या पलीकडील अनंतत्व, सर्व परिवर्तनाच्या मागील अपरिवर्तनीय, अमर आत्मा आणि त्याचे अस्तित्व इत्यादि. प्रत्यक्ष निरीक्षण किंवा प्रयोग यांना अप्राप्य अशा निसर्गातील किंवा निसर्गातीत शक्तींचे अस्तित्व हे शास्त्र केवळ बुद्धीच्या साहाय्याने पूर्वप्राप्त रीतीने गृहीत धरते. श्री. एम्. एन्. रॉय यांनी Metaphysics आणि Philosophy यांच्या कार्यात भेद केला तो असा – वस्तूंचे सत्यस्वरूप समजून घेणे आणि निसर्गातील विविध वास्तव घटनांचा (Phenomena) सामान्य उगम निसर्गातच शोधणे हे तत्वज्ञानाचे कार्य आहे. वस्तूंचे ज्ञान करून घेण्यासाठी वस्तूच्या सत्य अस्तित्वाचा विचार सोडून निसर्गाच्या बाहेर आणि अतीत असणाऱ्या घटनांचे (Noumena) चिंतन करणे हे Metaphysics चे कार्य आहे. रॉय यांच्या मते तत्त्वज्ञान हे जडवादाशिवाय दुसरे काही असू शकत नाही. या दोहोतील हा भेद ध्यानात ठेवूनच हा ग्रंथ वाचावा.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

त्याचा परिचय अरबी पंडितांनी यूरोपीय जगाला करून दिला. आणि पुढे रेनासान्सच्या मानवतावाद्यांनी त्याचे पुनरुज्जीवन केले. त्यानंतर मात्र विचारसृष्टीच्या नभांगणातील तेजोगोलांनी एका मागून एक मानवी प्रगतीच्या उत्क्रांतिमय दृष्टिकोणावर प्रकाशझोत टाकायला सुरवात केली. शेवटी हेगेलने मानवजातीच्या संस्कृतीची तसेच जगाच्या इतिहासाची गुरुकिल्ली म्हणून या दृष्टिकोणाला मूर्त स्वरूप दिले. " मानवजातीच्या राजकीय प्रगतीची सबंध प्रक्रिया म्हणजे मुक्त होण्याच्या कल्पनेचा क्रमशः होत जाणारा साक्षात्कार आहे असे त्याला दिसून आले. "[१] आणि हीच पार्श्वभूमि हेगेलच्या भाववाद[२] आणि मार्क्सचा जडवाद यांना समान आहे. मानवी संस्कृतीच्या उषःकालापासून विचारांची जी उत्क्रांती झाली तीत मधून मधून खंड पडले आहेत, अशी जे कल्पना करतात ते अशा भ्रमात वावरतात की भूत कालात जणु तत्त्वज्ञान असे नव्हतेच आणि भविष्याचे तत्त्वज्ञान त्यांनाच तेवढे गवसले आहे. विचारांचा इतिहास हा मानवी संस्कृतीच्या इतिहासाची गुरुकिल्ली आहे; कारण त्यांची तर्कदृष्ट्या पुनर्रचना करणे शक्य आहे.

दंतकथा, आख्यायिका, पुराणे, इत्यादींच्या स्वरूपात गतकालीन गोष्टींची काहींना काही नोंद ठेवण्याचा प्रघात सर्व प्राचीन मानवसमूहात आढळून येतो. पण ग्रीकांचा उदय होईपर्यंत इतिहासाच्या व्यवस्थित लेखनाला प्रारंभ झाला नव्हता. मानवी जीवनाच्या प्रत्येक प्रश्नाकडे पाहाण्याची ग्रीकांची बुद्धिवादी आणि ऐहिक दृष्टी विलक्षण होती. खिस्तपूर्व ५८५ मध्ये थेलिस या शास्त्रज्ञाने ग्रहणाचे केलेले भाकित तंतोतंत खरे ठरले. त्यावेळेपासून मानवाच्या आध्यात्मिक विमोचनाला प्रारंभ झाला. विमोचनाचा हा मानवी झगडा युगानुयुगे अप्रतिहत चालत आला आहे. त्यात मानव क्रमाक्रमाने विजयी होत आला आहे. ग्रहणाचे भविष्य ठरले. या युगप्रवर्तक घटनेने आयोनिआच्या विचारवंतांना अशी कल्पना सुचली की, असंख्य देवतांच्या लहरीनुसार भौतिक घटना घडतात हे खरे नाही. या विचारामुळे त्यांच्यातील तीव्र जिज्ञासावृत्ती जागी झाली. आणि प्रत्येक गोष्टीची चिकित्सा त्यानी आरंभिली. मानवाच्या भूतकालाचीही तपासणी त्यानी सुरू केली. तत्वज्ञान हे इतिहासाचे मूल सूत्र आहे हे हेगेलचे मत किंवा " उदाहरणांच्या साह्याने शिकविणारे तत्वज्ञान म्हणजे इतिहास आहे " हे ( बॉलिंग्ब्रोकचे ) मत यांचा मूळ उगम थुसिडायडिस पासून झाला. त्याचे विशदीकरण हेलीकार्नासस्च्या डायोनिशियसने खि. पू. पहिल्या शतकात जवळ जवळ आधुनिक स्वरूपात केले. अशा प्रकारे इतिहासलेखनाला तत्वज्ञानापासून स्फूर्ति मिळाली. त्यामुळे तत्वज्ञानाच्या इतिहासाने तर्क आणि अनुभववाद[३] या दोन्ही दृष्टींनी मानवी संस्कृतीच्या इतिहासाला प्रेरणा दिली. म्हणून मिशलेने म्हटले की " निसर्ग विरुद्ध मानव, दैव विरुद्ध स्वातंत्र्यवाद, यांच्या संग्रामाची कथा म्हणजे मानवेतिहास होय. "

मध्यंतरीच्या एक हजार वर्षांच्या काळात खिस्तीधर्माचा जबरदस्त पगडा बसल्यामुळे युरोपात जिज्ञासेची ऐहिक प्रवृत्ति दबली गेली होती. त्यामुळे, साहजिकच इतिहास ईश्वरविज्ञानाची बटीक होऊन राहिला. एका अर्थी हेही छुपे वरदान ठरले. कारण खिस्ती पाद्रीच्या इतिहासलेखनातूनच ( Patristic Historio-

१. Hearnshaw, The Science of History.

२. भाववाद म्हणजे Idealism. भाव म्हणजे चित्त; भाववादात चित्त ( mind ) कल्पना, विचार हे प्रधान व वस्तू दुय्यम किंवा बाह्यवास्तवतेचे अधिष्ठान विचार, कल्पना वा भाव यात असते, असे मानणारी तत्वज्ञानाची पद्धती म्हणजे भाववाद होय. भाववादाप्रमाणे सत्य हे मूलतः आध्यात्मिक किंवा मानसिक किंवा बौद्धिक असते. भाववाद हा जडवादाला प्रतिरोधी आहे.

३. अनुभववाद Empiricism म्हणजे माणसाला होणाऱ्या ज्ञानाचा उगम त्याच्या अनुभवात असतो. असे सांगणारा तत्वज्ञानाचा वाद. इंद्रियजन्य अनुभवाने मिळणारे ज्ञान हेच खरे ज्ञान असे हा वाद सांगतो. ज्ञान प्राप्त करून देणाऱ्या अनुभवात निरीक्षण आणि प्रयोग यांचाही समावेश होतो.

४. खिस्ती शकाच्या आरंभीच्या शतकात काही पाद्री पंडित इतिहासकार होऊन गेले. त्यांच्या धर्मविषयक इतिहासलेखनाला उद्देशून Patristic Historiography असे म्हणण्याचा प्रघात आहे.



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

graphy )[४] पुढे इतिहासाचे शास्त्र निर्माण झाले. ईडनच्या बागेतील मानवाच्या पतनापासून तो पापमुक्त होईपर्यंतचा इतिहास ही एक उत्क्रांतिवादी प्रक्रिया आहे, कार्यकारणात्मक घटनांची साखळी आहे, हे मान्य केल्याखेरीज ख्रिस्ती इतिहासाची कल्पनाच करता येत नाही. प्राग्दिष्टवादाचे[१] ख्रिस्ती पोथीतत्त्व ही मुद्दा मूलतः बुद्धिप्रमाण कल्पना आहे. सृष्टीच्या उत्पत्तीचा चमत्कार एकदा घडल्यानंतर नसल्यातून काहीही निर्माण होऊ शकत नाही. मोक्षाकडे किंवा पापमुक्तीकडे नेणारी प्रत्येक गोष्ट ही कारणानेच म्हणजे ईश्वरी इच्छेनेच घडते– ती कारणान्वित असतेच. हा बुद्धिवादी दृष्टिकोण पाद्री इतिहासकारांनासुद्धा कॅथालिक चर्चच्या भूमिकेला बळकटी आणण्यासाठी विकसित करावा लागला. चौथ्या शतकात युसिबियसने लिहिलेला चर्चचा इतिहास हा ग्रीकांच्या काळानंतर मानव समाजाचा इतिहास लिहिण्याचा पहिला प्रयत्न होता. त्या नंतरच्या शतकात सेंट आगस्टीनने लिहिलेला ' देवनगरी ' हा ग्रंथ जागतिक वाङ्मयातील महत्त्वाचा टप्पा आहे. नायसिआचे धर्मतत्त्व[२] बुद्धी सिद्ध करण्याचा प्रयत्न त्यात आहे एवढ्यापुरतेच या ग्रंथाचे महत्त्व नाही तर इतिहासाच्या तत्त्वज्ञानाविषयीचा तो पहिला प्रबंध होता हेच त्याचे महत्त्व आहे. ( सेंट ऑगस्टीनला कदाचित् त्याची जाणीवही नसेल. )

जडद्रव्य अविनाशी आहे; तसेच विचारही अविनाशी आहेत. विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांच्या संस्थापकांनी पेटविलेली जिज्ञासावृत्तीची ज्योत तमोयुगाच्या एक हजार वर्षांच्या घनदाट अंधकारामुळेही विझू शकली नाही. निसर्गविरुद्ध मानव या आरंभापासूनच्या झगड्यातून निर्माण झालेली स्फूर्तिप्रद परंपरा जरी ख्रिस्तधर्मी यूरोपने अव्हेरिली होती, तरी पाखंडी अरबांनी ती जतन करून ठेवली आणि ख्रिस्ती वारसदारांच्याच ती हवाली केली. ग्रीक आचार्यांचे विशेषतः ॲरिस्टाटलच्या ग्रंथांचे अध्ययन करणारी अरबीपंडितांची एक महान परंपरा १० व्या शतकानंतर निर्माण झाली. त्यात इतिहासशास्त्राला वाहून घेतलेली एक परंपरा होती. तिची परिणती १४ व्या शतकाच्या अखेरीस इब्न खलदून या पंडिताने लिहिलेल्या ' विश्वेतिहास ' या ग्रंथात झाली. इतिहासाच्या तत्त्वज्ञानाविषयीचा त्याचा हा प्रबंध इतका प्रगाढ होता की, त्यामुळे तो इतिहासशास्त्राचा प्रस्थापक समजला जातो.[३] प्राचीन ग्रीक

१. प्राग्दिष्टवाद हा Predestination या शब्दाचा मराठी पर्याय आहे. ईश्वरविज्ञानाला अनुसरून सर्व गोष्टींचे भवितव्य ईश्वराने पूर्वीच ठरवून ठेवलेले असते, म्हणून जगातील सर्व घडामोडी प्रथमच ईश्वराने ठरविल्याप्रमाणे होत असतात, असे हा वाद सांगतो. त्यात बदल होणे किंवा करणे मानवाधीन नसते. तसेच त्यात कार्यकारणभावही नसतो. या वादास पूर्वनिर्णीतवादही म्हणता येईल.

२. नायसिआचे धर्मतत्त्व म्हणजे चर्चमध्ये आभारप्रदर्शनांच्या उपासनाप्रसंगी जे धर्मतत्त्व अवलंबिण्यात येते ते. नायसिआच्या पहिल्या धर्मसभेने पुरुषत्रयीचे जे तत्त्व ठरविले ते कॉन्स्टँटिनोपलच्या धर्मसभेने विस्तारित करून धर्मतत्त्व बनविले. नायसिआची पहिली सभा कॉन्स्टन्टाइन बादशहाने इ. स. ३२५ मध्ये भरविली होती. त्याकाळी ख्रिस्तधर्मीयात अनेक मतभेद व वाद निर्माण झाले होते. त्यातील एक वाद पुरुषत्रयीच्या स्वरूपाविषयी होता. अलेक्झांड्रिआचा एक पाद्री एरिअस याने असे मत प्रतिपादन केले की, पिता ( देव ), पुत्र ( येशू ) हे समान एकद्रव्यी नसून भिन्न आहेत; अवतार घेण्यापूर्वी पुत्राला अस्तित्व असले तरी ते अनादिकालापासूनचे नाही; प्रेषित हा खराखुरा माणूस नसून दैवी पुरुष आहे. दुसरा म्हणजे सॅबेलिअसचे म्हणणे असे होते की पुरुषत्रयीतील तीनही पुरुष हे एकच, अभिन्न असून एका पुरुषाची ती वेगळी स्वरूपे आहेत. ख्रिस्ती धर्मातील हे वाद मिटवावेत म्हणून कॉन्स्टन्टाइनने समस्त ख्रिस्त धर्मीयांची सभा आशिया मायनरमधील नायसिआ येथे बोलाविली. या सभेने एरिअसचे पाखंड मोडून काढले आणि पुरुषत्रयीतील पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा हे एकद्रव्यी आणि समान असून ते पृथक् पुरुष आहेत हे सनातन मत प्रस्थापित केले. नायसिआच्या पहिल्या सभेने ख्रिस्तीधर्म संस्थाबद्ध करण्याचा पाया घातला. चर्चच्या इतिहासात एकूण २१ धर्मसभा भरल्या. कॉन्स्टॅन्टिनोपलची धर्मसभा इ. स. ३८१ मध्ये भरली होती.

३. Robert Flint, History of The Philosophy of History.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तत्त्ववेत्यांच्या ऐहिक आणि बुद्धिवादी चेतनेपासून स्फूर्ती घेऊन अरबी संस्कृतीने आपल्या ज्ञानसंपदेचे लोण स्पेन आणि इटली येथील विद्यापीठांच्या द्वारे यूरोपमध्ये पोचविले. यूरोपच्या वैचारिक पुनरुज्जीवनाला झालेले अरबी संस्कृतीचे साहाय्य अगण्य आहे. इतिहासाचे परिशीलन ऐहिक दृष्टिकोणातून करण्याच्या पद्धतीचे मानवतावादी पुनरुज्जीवन झाल्यामुळे विचाराच्या गतिमत्तेचे एक वर्तुळ पूर्ण झाले. अतिप्राचीन काळचा मूल्यवान वारसा घेऊन व्हिकोने भविष्यकालच्या विकासांची दिशा दाखवून दिली. इतिहासाचे तत्त्वज्ञान आणि तत्त्वज्ञानाचा इतिहास यांचा संगम त्याच्या लिखाणात झाला होता. म्हणूनच मिशलेने त्याला गुरुस्थानी मानले होते. मिशलेने हेगेल आणि मार्क्स यांच्या परस्पर विरोधी सिद्धान्तांचा मिलाफ घडवून आणला.

व्हिकोने इतिहासाचे दोन प्रकार सांगितले. एक भाषांचा इतिहास आणि दुसरा घडामोडींचा इतिहास. घडामोडी म्हणजे मानवाची राजकीय आणि सामाजिक कृत्ये. घडामोडींचा व्यापक अर्थ घेतला तर इतिहासाच्या व्याप्तीत भूगर्भशास्त्राचाही समावेश करावा लागेल. व्हिकोने सुचविले की भाषाशास्त्र हे इतिहासाचाच एक भाग समजावा. ही सूचना फार महत्त्वाची होती कारण तीत इतिहास आणि भाषाशास्त्र यांच्यातील घनिष्ठ संबंध प्रतीत होत होता. भाषाशास्त्र हे तत्त्वज्ञानाचेच एक अंग आहे. प्रारंभीच्या अवस्थेत तत्त्वज्ञानाचा इतिहास आणि भाषांचा इतिहास हे एकरूप होते. निरीक्षण आणि प्रयोग या जशा विज्ञानाच्या पद्धती आहेत तशीच समीक्षण ही इतिहासशास्त्राची पद्धती आहे. गतकालाचा अभ्यास करावयाचा तो वर्तमानाचा बुद्धिप्रमाण किंवा युक्त उलगडा करता यावा यासाठी. भूत आणि वर्तमान यांचा बुद्धिप्रमाण म्हणजे युक्त संबंध असतो. या संशोधनामुळे इतिहास ही विकासाची प्रक्रिया आहे, हे सिद्ध झाले. परिणामी ऐतिहासिक घटनांचे नियंत्रण करणारे सर्वसाधारण नियम शोधून काढून इतिहासाचे तत्त्वज्ञान रचणे शक्य झाले.

इतिहासकाराला अभ्यास करण्यासाठी भूतकाल आयता तयार असतो असे होत नाही. फक्त जुन्या काळच्या काही नोंदी उपलब्ध असतात. त्या दोन प्रकारच्या असतात. एक भौतिक स्वरूपाची म्हणजे अवजारे, वस्तूचे आणि वास्तूंचे भग्नावशेष, हस्तव्यवसाय, कला, इत्यादींचे उपलब्ध पुरावे वगैरे. दुसरा प्रकार आलेखाच्या स्वरूपात असतो. यांना आपण मानसिक किंवा आध्यात्मिक पुरावे म्हणू शकू. यातील दुसरा प्रकार हा प्रामुख्येकरून महत्त्वाचा आहे. कारण त्याच्या साहाय्यानेच वस्तुरूप पुराव्यांचे महत्त्व पूर्णपणे आकलन करता येणे शक्य होते. गतकालीन आलेखाच्या समीक्षणाच्या आधाराने इतिहासाची पुनर्रचना करण्याचे भाषाशास्त्र हे महत्त्वाचे साधन आहे; म्हणून भाषांचा इतिहास हा इतिहासशास्त्राचेच एक अंग आहे. दुसरे असे; जीवाच्या विकासप्रक्रियेच्या क्रमात, प्राथमिक स्वरूपाचे मनोभाव आणि विचार यांची अभिव्यक्ती, आणि परस्परातील देवाण घेवाण यांचे साधन म्हणून शब्द जन्माला आले. असंबद्ध विचार आणि मनोभाव एकत्र गोवून अर्थवाही करण्यासाठी भाषा वाढीला लागल्या. याचाच अर्थ असा की, भाषांचा इतिहास हा आरंभीच्या विचाराच्या विकासाचा तसाच प्राथमिक तत्त्वज्ञानाचा इतिहास आहे. भाषाशास्त्राच्या साहाय्यावाचून इतिहास लिहिणे अशक्य होते. एवढ्या अर्थाने तत्त्वज्ञानाचा इतिहास म्हणजे मानवी संस्कृतीचा इतिहास हे हेगेलचे म्हणणे योग्य ठरते. बहुधा इतिहास दोन प्रकारचे या व्हिकोच्या तत्त्वावरून हेगेलने ती कल्पना उचलली असावी. गतकालीन आलेखांच्या चिकित्सक अभ्यासाने इतिहास मानवाच्या कृत्यांमागील सुप्त प्रेरणा शोधून काढतो. म्हणून विचाराचा इतिहास या रूपाने भूतकालाची पुनर्रचना योग्य रीतीने करता येणे शक्य झाले आहे. हेगेलचे हेच विधान जर क्रोचेच्या “ सर्व जातिवंत इतिहासकार इच्छेने वा अनिच्छेने तत्त्वज्ञ असतात ” या शब्दात सांगितले तर इतिहासासंबंधीचे सर्वसाधारण सत्य त्यात सामावलेले आहे, हे प्रत्ययास येईल.

सामाजिक विकासाच्या प्रक्रियेत बुद्धीला जर स्थान नसेल तर इतिहासाची जडवादी कल्पना म्हणजेच संस्कृतीचा इतिहास वर्गयुद्धाच्या इतिहासाशी एकरूप समजणे ही गोष्ट निरर्थक ठरते. मग माणसाला कार्यप्रवण करणारे तत्त्वज्ञान म्हणून मार्क्सवादाला स्थानच राहणार नाही आणि क्रांत्या अशक्यकोटीत जाऊन बसतील. पण क्रांत्या या ऐतिहासिक दृष्ट्या अपरिहार्य असतात. तसेच क्रांतीच्या विचाराने भारलेली माणसेच क्रांत्या घडवून आणतात, हेही तितकेच खरे आहे









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तथापि उत्पादनाच्या साधनांच्या साहजिक विकासाबरोबर त्यांच्या अनुषंगाने घडून येणाऱ्या घटनांची मालिका म्हणजे इतिहास असे समजणे असमंजसपणाचे आहे. इतिहासाच्या उत्क्रांतिवादी प्रक्रियेतून मानवाला वगळता येणे शक्य नाही. सामाजिक शक्ती म्हणजे गूढ आध्यात्मिक शक्तींचे प्रकार नव्हेत. सामाजिक शक्ती म्हणजे मानवाच्या सर्जनशक्तीचा आविष्कार होय. आणि सर्जनशील मानव हा नेहमीच विचार करणारा असतो.

सामाजिक उत्क्रांती आणि सांस्कृतिक इतिहास यांना लागू पडणारा आर्थिक नियतिवाद हा जडवादातून अवश्यतया उद्भवतोच असे नाही. जडवाद हे तत्त्वज्ञान आहे; तर आर्थिक नियतिवाद ही इतिहासमीमांसेची एक पद्धती आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने विचाराचे वस्तुनिष्ठ सत्यत्व जडवादाला मानावेच लागते. ज्ञानशास्त्रात[1] तेवढा जडवाद शुद्ध असू शकतो. इतिहास विशेषतः सांस्कृतिक इतिहास हा सुद्धा ध्येयवाद दृष्ट्या नियत होतो. म्हणून ऐतिहासिक नियतिवाद हा केवळ आर्थिक स्वरूपाचाच असतो असे समजणे चुकीचे आहे. इतिहास नियत केला जातो हे खरे असले तरी त्याला नियत करणारे घटक अनेक असतात. शिवाय नियतिवाद[2] ही तार्किक कल्पना आहे. नियत प्रक्रियेत ती मूलतःच असते. तीत कोणताही आगंतुक घटक हस्तक्षेप करीत नाही. असे नसेल तर ती प्रक्रिया ( Dualistic ) द्विधात्म होईल. परंतु नियतिवादाच्या तर्कनिष्ठ कल्पनेत ऐकात्म्य ( Monism ) अंगभूतच असते. तर्कदृष्ट्या जडवाद हेच केवळ एक परिपूर्ण तत्त्वज्ञान आहे. कारण त्यातच केवळ ऐकात्म्य शक्य असते. म्हणून नियतिवाद हा जडवादात मूलतःच असतो. पण आर्थिक नियतिवाद ही द्विधात्म कल्पना असल्याने जडवादाशी ती संबद्ध असतेच असे नाही.

इतिहासाच्या जडवादी कल्पनेला मानवी बुद्धीची सर्जनशीलता तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने मान्य करावीच लागते. विचारांचे वस्तुनिष्ठ सत्यत्व जडवाद नाकारू शकत नाही. विचार हे अलिप्त नसतात. जीवशास्त्राच्या नियमांनी ते नियत होत असतात. यात भौतिक अस्तित्वाला अग्रक्रम असतो. जुनी परिभाषा वापरावयाची झाली तर जडाला प्राधान्य असते. पण विचार घडणीची जीवशास्त्रीयदृष्ट्या नियत होणारी प्रक्रिया एकदा पूर्ण झाली म्हणजेच विचार एकदा तयार झाले म्हणजे मग मात्र त्याना स्वायत्त अस्तित्व प्राप्त होते. त्यांचा स्वतःचा वेगळा विकासक्रम सुरू होतो. हा विकासक्रम सामाजिक उत्क्रांतीच्या भौतिक प्रक्रियेशी समान्तर असतो. वैचारिक आणि भौतिक अशा समान्तर प्रक्रियांचा मिळून इतिहास घडत असतो. या दोन्ही प्रक्रियांची नियति त्यांच्यातील अंतर्गत तार्किकता किंवा गतिमानता अथवा द्वंद्वात्मकता त्याच्यामुळे होते. त्याचवेळी ह्या दोन्ही प्रक्रियांचा एकमेकावर प्रभाव पडतो. अशा प्रकारे इतिहास ही एक सुसंघटित प्रक्रिया होते. भूतकाळाचे अधिक बुद्धिप्रमाण ज्ञान प्राप्त होऊन वर्तमानकाळाचा उलगडा जर अधिक निश्चितपणे करता येईल तर भाववाद आणि जडवाद यांचे केवळ संश्लेषण किंवा अधिक समर्पक शब्दांत सांगावयाचे झाल्यास मानवजातीच्या साऱ्या विचारसंपदेच्या वारसाचे निर्विकारपणे आणि व्यापकपणे मर्मग्रहण करणे हेच भविष्यकाळचे तत्त्वज्ञान बनू शकते, हे स्पष्ट होईल. अशा तऱ्हेचे निःपक्ष तत्त्वज्ञान आज क्षितिजावर साचलेल्या घनदाट विषण्णतेवर प्रकाशझोत टाकून मानवजातीला अगतिकतेतून बाहेर काढणारी नवी वाट उजळील.

हेच विधान अधिक सुस्पष्ट करावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की, मानवजातीच्या उत्क्रांतीच्या ज्या ऐतिहासिक, सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक इत्यादी प्रक्रिया चालत असतात त्या सर्वांमध्ये

१. मानवी ज्ञानासंबंधीचे जे शास्त्र ते ज्ञानशास्त्र ( Epistemology ). हे शास्त्र ज्ञानाचे स्वरूप, त्याची पद्धती, त्याला आधारभूत गोष्टी, त्याच्या मर्यादा आणि प्रमाणे यांचे विवेचन करते. याला प्रमितिशास्त्र असेही म्हणता येईल.

२. नियतिवाद ( determinism ) म्हणजे एखादी गोष्ट विशिष्ट कारणामुळे किंवा घटनांच्या मालिकेमुळे घडते, त्यामुळेच ती निश्चित किंवा नियत होते हे तत्त्व. या तत्त्वाप्रमाणे गोष्टी जशा घडतात तशा त्या अनिवार्यतेने घडतात. या वादाचा विशेष म्हणजे तो पर्यायी कारणसंबंध मान्य करीत नाही. म्हणजे पर्यायी अनेक कारणांनी कार्य घडत नसते.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विचारांच्या गतिमानतेला निर्णायक महत्व आहे असे निःसंदिग्धपणे मान्य करणारे तत्त्वज्ञान निर्माण होणे आवश्यक आहे. त्यासाठी जडवादाची नव्याने मांडणी झाली पाहिजे. ज्ञानशास्त्राच्या दृष्टीने भाववाद हा ज्ञान-शास्त्रदृष्ट्या खंडित ठरतो. प्रत्यक्ष ज्ञानाच्या समस्येने तत्त्वज्ञानाला युगानुयुगे गोंधळात टाकले होते. पण इंद्रियविज्ञानाच्या नव्या शोधांच्या साहाय्याने आधुनिक जडवादाने ही समस्या सोडविली आहे. त्यामुळे भौतिकी आणि मानसशास्त्र याच्यातील खिंडार आता अनुल्लंघनीय राहिले नाही. मानसशास्त्र आणि इंद्रिय-विज्ञान यांचा संयोग झाल्यामुळे त्या खिंडारावर आता सेतु बांधला गेला आहे. उच्च पातळीवर विकसित झालेल्या सजीव वस्तूंच्या घटकांचे कार्बन संयोगामध्ये पृथक्करण करता येणे शक्य झाले आहे. कार्बन संयुगे ही वस्तुरूप रासायनिक पदार्थ आहेत. या नव्या शोधामुळे जीवांच्या उत्क्रांतीच्या क्रमामध्ये गूढ आध्यात्मिक तत्त्वे आता घुसडता येणार नाहीत. बर्गसाँचे– ‘ एलान् व्हिताल[1] ( जीवशक्ति ) ’ किंवा ड्राइशचे ‘ अेन्टेलेकी ( प्रज्ञानात्मा )[2] ’ अशा गूढाना आता त्यात स्थान नाही. त्यांना स्थान देणे म्हणजे प्रायोगिक विज्ञानाची भूमिका सोडून आडरानात शिरण्यासारखे आहे. भाववाद ज्यावेळी तत्त्वज्ञानाला अनुभवाच्या कक्षेपलीकडे घेऊन जातो आणि अतींद्रिय विषयात शिरतो त्यावेळी धर्मापासून त्याला वेगळे काढता येत नाही. म्हणून बन्धमुक्त होण्याचा ध्यास घेणाऱ्या मानवाला भाववाद उपयोगी पडत नाही. प्लेटोप्रणीत ‘ सामान्ये ’ ( Universals ) ही केव्हाच मागे पडली आहेत. या प्राचीन मुनीने जे सांगितले होते त्यात फारच थोडी भर खऱ्या भाववादी तत्त्वज्ञानाने घातली आहे. देकार्तच्या कालापासून अर्वाचीन भाववाद द्विधात्मतेच्या दुष्ट चक्रातून बाहेर पडू शकला नाही. त्यामुळे तत्त्व-ज्ञानाची पुढची वाढ खुंटली. कारण ते धर्माच्या आडवाटेत शिरले. कांट हा अतींद्रियवादी असून सुद्धा तो समजला जातो त्यापेक्षा जडवादाला अधिक जवळचा आहे. स्पिनोझा आणि हेगेल यांचा एकात्म भाववाद हा जडवादाचा व्यत्यास होता.

विचारांचा स्वतंत्र इतिहास असतो आणि संस्कृतीच्या उषःकालापासून मानवजातीच्या इतिहासाची पुनर्रचना करण्याची गुरुकिल्ली तत्त्वज्ञानाच्या इतिहासात असते; हा भाववादाचा दावा विचारात घेतला म्हणजे भाववाद जडवादात मिसळून जातो, हे स्पष्टपणे दिसून येईल. हे दोन्ही वाद एकत्र मिळून भूत आणि वर्तमान यांचे व्यापक स्पष्टीकरण करतात आणि भविष्याची अज्ञात दालने शोधण्याच्या कामी मानवजातीला बुद्धिप्रमाण मार्गदर्शन करतात.

“ ज्यावेळी विचार हे पुढे पुढे दौड करीत जातात आणि त्यांच्या मागून त्यांची परिपूर्ती पाठलाग करीत जाते, त्याच वेळी नव्या धर्तीच्या संस्कृतीमध्ये समाजाचे जलद संक्रमण होत असते. मानवजातीचे ओज त्याचवेळी कल्पकतेच्या साहसात झेप घेते. त्याच वेळी सर्व जगाला आगामी भव्य दृश्यांची स्वप्ने पडतात. योग्य समय येताच या स्वप्नाच्या परिपूर्तीचा महान साक्षात्कार घडून येतो. साहसाचे सामर्थ्य असले म्हणजे केव्हा ना केव्हा मानवी प्रतिभा त्या त्या युगाच्या मर्यादांचे बंधन ओलांडून आणि तत्कालीन अभिरुचीच्या पंडितमान्य लक्ष्मणरेषा झुगारून देऊन पलीकडे उड्डाण करते. या उड्डाणाने निर्माण होणारा विस्कळितपणा व गोंधळ ही सांस्कृतिक प्रयत्नांची नवी ध्येये अवतीर्ण होण्याची ग्वाही देतात.[3] ”

आजच्या युगातील श्रेष्ठ भाववादी तत्त्ववेत्त्याच्या या विचाराशी सहमत होणे हे कोणाही समंजस जड-वाद्याला कठीण वाटणार नाही. इतिहासात महान क्रांत्या कशा घडून येतात हे स्पष्ट करणारा याहून

१. एलानव्हिताल ( Elanvital ) याचा अर्थ जीवनाची मूलभूत प्रेरकशक्ती. बर्गसाँ या तत्त्ववेत्त्याच्या मते सर्व सचेतन वस्तूत अंतस्थ असे निर्मातृ बीजतत्त्व असून तेच मूलभूत सत्य असते, या तत्त्वामुळेच उत्क्रांती होत असते.

२. ( Entelechy ) एन्टेलेकी हे जीवातील महत्त्वाचे तत्त्व वा आत्मा असे मानतात. या तत्त्वाप्रमाणे प्रत्येक जीवात अंतस्थ अशी यांत्रिक शक्ती असून ती जीवनाच्या मूलभूत प्रक्रियांचे नियंत्रण करते देहाला आकार देते, त्यामुळे जीवनाला संपूर्णता प्राप्त होते.

३. A. N. Whitehead, Adventures of Ideas-








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अधिक चांगला मार्ग सापडणार नाही. इतिहास घडविण्यात मानवाच्या देहापेक्षा त्याच्या मेंदूचा वाटा अधिक आहे. विचार ही इतिहासाची प्रेरकशक्ती आहे. हे महान सत्य नाकारल्यामुळे इतिहासाची जडवादी मीमांसा अगदी उथळ ठरली असून ऐतिहासिक नियतिवाद हे तर्कदूषित विधान झाले आहे. समाजाची उत्क्रांती आणि त्याचा सांस्कृतिक इतिहास हा सुद्धा आर्थिक शक्तींच्या व्यापारामुळे पूर्णपणे नियत होतो हे मत तर्कदृष्ट्या जडवादापासून निष्पन्न होत नाही; किंवा अनुभववादी दृष्टीने ते कसाला उतरू शकत नाही. सामाजिक तत्त्वज्ञान या संकुचित अर्थाने सुद्धा मार्क्सवाद हा आर्थिक नियतिवादाशी एकरूप नाही. सामाजिक, सांस्कृतिक आणि राजकीय इतिहास हे नियत असतात; कारण सृष्टी ही एक विश्वव्यवस्था आहे; ती एक नियमबद्ध अशी बुद्धिप्रमाण पद्धती आहे. सृष्टीप्रमाणेच इतिहासातही नियत करणारे घटक एकापेक्षा अधिक असतात. मानवी बुद्धी ही त्यापैकीच एक आहे. विशेषतः मानवाचा सांस्कृतिक इतिहास हा फार मोठ्या प्रमाणात विचारांनी नियत झाला आहे.

विचारांच्या पद्धती या केवळ आर्थिक संबंधावर उभ्या असलेल्या मंदिराप्रमाणे आहेत, असे सांगून जीवनाच्या भौतिक अवस्थांशी त्यांना प्रत्यक्ष जखडून टाकल्यामुळे इतिहासाची जडवादी कल्पना अयशस्वी ठरली आहे. विचारांचा तर्कशुद्ध विकास आणि सामाजिक शक्तींचे उत्थापन ही एकसमयावच्छेदेकरून होत असतात. ही दोन्ही मिळून इतिहासाची प्रेरकशक्ती बनतात. मानवी कृतीला विचारापासूनच प्रेरणा मिळते, एवढ्या अर्थाशिवाय इतिहासाच्या कोणत्याही काल-खंडात या दोहोंचा कार्यकारणसंबंध जोडता येत नाही. नव्या विचारांचा मागोवा जुन्या विचारातच घ्यावा लागतो. तत्त्वज्ञानाला स्वतःचा इतिहास असतो. तत्त्वज्ञान म्हणजे रंगीबेरंगी आभासांचा चित्रपट नव्हे. ज्या अर्थी कृतीला विचारापासून प्रेरणा मिळते त्याअर्थी इतिहासातील नियतिवाद हा प्रामुख्याने विचारांचाच भाग आहे. ऐतिहासिक नियतिवादाचे पुरस्कर्ते ज्यावेळी विचारांचे गतिशास्त्र बाजूला सारतात आणि उथळ एकांगी दृष्टीने विचार करतात त्यावेळी नियतिवादाची शोचनीय अवस्था होते.

इतिहासाच्या वाटचालीत स्थापित समाजव्यवस्थेच्या गरजा वेळोवेळी अडथळे आणतात. स्थापित समाज-व्यवस्था मानवाच्या भौतिक वा मानसिक सर्जनशक्तीला मर्यादा घालतात. जीवनार्थ कलहातून जन्माला आलेली प्रगती आणि स्वातंत्र्य यांची आंतरिक प्रेरणा मार्गातील अडथळे मोडून काढण्यासाठी नव्या जोमाने सिद्ध होते. गतकालीन सांस्कृतिक मूल्ये आणि विमोचक विचार आत्मसात् करणारे महापुरुष निर्माण होतात. मानवा-तील सुप्त शक्तींच्या आविष्काराला अधिकाधिक अवकाश देणाऱ्या नव्या समाजव्यवस्थेचे साक्षात्कार या महापुरु-षांना घडतात. मानवजातीच्या आध्यात्मिक वारसातून एक नवे तत्त्वज्ञान जन्माला येते; आणि समाजाच्या पुनर्रचनेची सुहूर्तमेढ रोविली जाते.

मानवाचे स्वातंत्र्य आणि त्याची सर्जनशक्ती यांच्या-वरील उत्कट श्रद्धेत जीवनाच्या अद्‌भुतरम्य दृष्टिकोणाचे रहस्य साठलेले आहे. म्हणूनच क्रांतीची कल्पना ही अद्‌भुतरम्य कल्पना आहे; त्या बरोबरच ती बुद्धिप्रमाण कल्पना आहे; कारण क्रांत्या या अनिवार्यतेतून निर्माण होत असतात. यावरून क्रांती आत्मविसंगत कल्पना आहे, असा समज होण्याचा संभव आहे. बुद्धी आणि अद्‌भुतरम्यवाद ही एकाच विकासात्मक प्रक्रियेत सामावू शकतील काय ? इतिहासाच्या तत्त्वज्ञानाची ही मूलभूत समस्या आहे.

निसर्ग आणि इतिहास यांची बुद्धिप्रमाण पद्धती ही नियत असते; तिने आपले मार्गक्रमण केलेच पाहिजे; कोणत्याही मानवी प्रयत्नांनी ती बदलता येत नाही; अशी बुद्धिवादी दृष्टी पत्करली तर क्रांत्यांची शक्यताच वगळली जाईल. बुद्धिवादी भूमिका न सोडताही या प्रश्नाकडे पाहण्याचा दुसरा एक मार्ग आहे. मानवाची इच्छा ही निसर्गाचाच एक भाग आहे. तीही बुद्धि-प्रमाण व्यवस्थेतून वाढत असते. मानवाच्या आकांक्षा आणि तत्प्रीत्यर्थ त्याची धडपड यासुद्धा नियत होतात. म्हणून क्रांती अनिवार्यतेतून जन्माला येते. क्रांत्या या इतिहासाने नियत केल्या जातात. इतिहासातील उत्परिवर्तने या दृष्टीने त्या सामाजिक उत्क्रांतीच्या बुद्धिप्रमाण प्रक्रियेत अंतर्भूत असतात.

बुद्धिवाद आणि अद्‌भुतरम्यवाद यांच्यातील फरक असा की बुद्धिवाद कोणती गोष्ट अनिवार्य आणि म्हणून शक्य कोटीतील आहे हे जाणतो, तर अद्‌भुत-






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रम्यवाद ईप्सित काय असावे आणि ते साध्य करण्यासाठी काय करावे हे बेदरकारपणे घोषित करतो. मग प्रश्न असे उद्भवतात की, क्रांतीची कल्पनाच बुद्धिविरोधी आहे का? क्रांतीच्या योजनेत मानवाच्या बुद्धीला स्थान नाही का? क्रांत्या जर अनिवार्यपणे होतात, तर त्यात बुद्धीला स्थान असलेच पाहिजे. अद्‌भुतरम्यवादाला बुद्धीचे तेज चढविले आणि बुद्धिवादात साहसाचा अद्‌भुतरम्य आत्मा ओतला म्हणजे क्रांत्या यशाची वाटचाल करतात.

निसर्गाच्या बुद्धिप्रमाण पद्धतीच्या पार्श्वभूमीवर मानवी जीवनाचा प्रपंच चालतो. जीवनात गुंतलेल्या उभ्या आडव्या धाग्यांची तार्किक पद्धतीने उकल करण्याचा प्रयत्न होतो. त्यामुळे वर सांगितलेले प्रश्न उभे राहतात. मी मी म्हणणाऱ्यांना ते गोंधळात टाकतात. बुद्धिवाद हा अभिजात जीवनदृष्टीचे बौद्धिक आणि नैतिक अधिष्ठान आहे; या उलट अद्‌भुतरम्यवाद म्हणजे अभिजात पुराणमतवादाविरुद्ध बंड होय. आणि म्हणून तो बुद्धिविरोधी आहे; असे तर्कसूत्र मांडून मुद्दा सोपा करण्याच्या प्रयत्नामुळे प्रयोजनवादातील[1] बुद्धिवादाची बुद्धीच्या ऐहिक कल्पनेशी गल्लत होते. बुद्धीची भौतिक कल्पना ही मानवी प्रज्ञेशी एकरूप आहे. म्हणून ती इच्छाशक्तीशी विरोधी असू शकत नाही. परिणामी जीवनाविषयीच्या बुद्धिवादी आणि अद्‌भुतरम्यवादी दृष्टिकोणात विरोध नाही. क्रांतीच्या कल्पनेत या दोहोंचा सुसंवाद घडून येतो. परंपरा, सनातनवाद आणि प्रयोजनवादी बुद्धी यांच्या जड श्रृंखला तोडण्यासाठी जर अद्‌भुतरम्यवाद ही महान प्रेरकशक्ति आहे, तर मग तोच क्रांतीचा सर्वांत प्रभावशाली प्रवर्तक होतो हे क्रमप्राप्त आहे.

अद्‌भुतरम्यवादी जीवनदृष्टी आत्मनिष्ठ असते. तिची तर्कशुद्ध परिणती व्हिकोपासून मार्क्सपर्यंतच्या कालखंडात विकसित झालेल्या 'मानव हा जगाचा कर्ता आहे.' या विमोचक तत्त्वात झाली. वास्तविक या तत्त्वाचा उगम या पूर्वीच रिनेसन्सच्या काळात झाला होता. प्रयोजनवादी बुद्धी आणि ईश्वरविज्ञानाची नीतिपद्धती याविरुद्ध मानवाचे बंड म्हणजे रिनेसन्स होय. याउलट आधुनिक वैज्ञानिक दृष्टिकोणात वाढलेला ऐहिक बुद्धिवाद हा वस्तुनिष्ठ असतो. या बुद्धिवादाप्रमाणे मानवी जीवनाची संगती तो अशी लावतो:— नियमबद्ध भौतिक विश्वाच्या रंगभूमीवर विकासात्मक प्रक्रियेत अवतीर्ण झालेला मानव जगाच्या केंद्रस्थानी असतो; निसर्गनियमांनी तो बांधला गेला असला तरी निसर्गावर क्रमशः ताबा मिळवत जाण्याची ताकद त्याच्या अंगी असते. तसे पाहिले तर, मूलतः बुद्धिवाद आणि अद्‌भुतरम्यवाद यांच्या जीवनदृष्टीत फार थोडा फरक आहे. आधुनिक मानसशास्त्राने आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ, विषय आणि विषयी यांच्यातील भेद पुसून टाकला आहे. त्यामुळे प्रत्यक्षज्ञानाची जुनी समस्या सुटली आहे. ज्ञानशास्त्राच्या दुष्ट चक्रातून तत्त्वज्ञानाची मुक्तता झाली आहे.

बुद्धिवाद आणि अद्‌भुतरम्यवाद या सकृद्दर्शनी विरोधी वाटणाऱ्या जीवनदृष्टीचे संश्लेषण घडवून आणण्याचा प्रयत्न म्हणजे मार्क्सवाद होय. कदाचित् मार्क्सलासुद्धा आपल्या तत्त्वज्ञानाच्या दूरगामी परिणामांची जाणीव झाली नसेल. त्यामुळे त्याच्या पद्धतीत अनेक तर्कदोष राहून गेले. त्यांचे स्पष्टीकरण केवळ पोथीनिष्ठ विवरण आणि फसवे प्रक्षेप यानीच करता येणे शक्य झाले. या दोहोंचा संयोग करण्याचा मार्क्सवादाचा अपुरा राहिलेला प्रयत्न शेवटास नेणे आवश्यक आहे. त्यासाठी गतकालातील विविध विचारप्रवाहांचा संगम घडवून आणून त्यातून जीवनाच्या तत्त्वज्ञानाची एक व्यापक पद्धती निर्माण करावी लागेल. पुढे त्यातही अंतर्विरोध निर्माण होतील. या अंतर्विरोधातून तत्त्वज्ञानाचा इतिहास आणि समाजाचा इतिहास यांचा जगन्नाथाचा रथ पुढे पुढेच मार्गक्रमण करीत जाईल. अखेरीस तेच तत्त्वज्ञान भव्योदात्त म्हणता येईल की जे अनंतत्वाची एकाहून एक विशाल दालने मानवजातीसमोर खुली करील आणि असे करीत असता मानवाची दिशाभूल करणाऱ्या अध्यात्माच्या गूढ आणि भ्रामक जंजाळातून मानवाची कायमची मुक्तता करील.

---

१. प्रयोजनवाद हा Teleology याचा प्रतिशब्द. प्रत्येक गोष्टीला एक अंतिम प्रयोजन किंवा हेतु असतो व त्याला अनुसरून ती प्रपंच करते हे मत म्हणजे प्रयोजनवाद. विशेषतः निसर्गाच्या संदर्भात हा वाद उपयोजिला जातो. अंतिम प्रयोजनाच्या किंवा देवसंकल्पाच्या अनुरोधाने निसर्गाच्या प्रक्रिया चालतात, केवळ यांत्रिक रीतीने किंवा कार्यकारण भावाने नव्हे, असे हा वाद सांगतो.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# वाचकांचा पत्रव्यवहार -

श्री. संपादक, नवभारत यास

नवभारत फेब्रुवारी १९६७ च्या अंकात श्री. खैरकर यांचा 'गीतेची भूमिका' हा लेख आला आहे, तो अनेक आक्षेपयुक्त आहे. त्यांना येथे थोडक्यात उत्तरे देत आहे.

प्रश्न १:– श्रीकृष्णोपदेशाचा उद्देश काय होता ?

उत्तर– क्लैब्य, कश्मल, हृदयदौर्बल्य, शोक, मोह या ज्या अज्ञानाच्या वृत्ति त्या सर्व घालवून जीव, जगत्, ईश्वर, आत्मा यांचे ज्ञान करून देऊन जीवनाचे दिव्य व भव्य दर्शन घडविणे हाच उपदेशाचा हेतू होता. अर्जुन युद्धालाच आला होता. आयत्या वेळचे कार्पण्य श्रीकृष्णाने घालविले.

प्रश्न २:– मोह म्हणजे काय ?

उत्तर– बुद्धि कुंठित होणे; हे करू का ते करू असा गोंधळ होणे, मुह–वैचित्ये.

प्रश्न ३:– गीतेतील युद्धविषयक विचार कालबाह्य झाले ?

उत्तर– मुळीच नाही पांडवांप्रमाणे ज्या व्यक्ति, समाज व राष्ट्रावर अन्याय व आक्रमणे होतील व जे युद्ध न व्हावे म्हणून अगदी पाच गावावर तडजोडीस सिद्ध होतील व ज्यांना सुईच्या अग्रावरची मातीही युद्धाविना मिळणार नाही; ती माणसे, तो समाज व ते राष्ट्र युद्धाचाच मार्ग अवलंबितील. भारतातील राजनीती व युद्धविचार कालबाह्य झाली नसून ती अनंत काळ टिकणारी आहे.

प्रश्न ४:– जीवनात युद्ध हे अटळ आहे काय ?

उत्तर– व्यक्ति, समाज, व राष्ट्र यांच्या जीवनात संघर्ष, प्रतिकार व युद्ध ही अटळ आहेत. मानवीजीवन हे किडामुंगीचे जीवन नव्हे. मानबिंदु, अभिमानस्थाने, परंपरा, व नागर जीवन यावर आक्रमण होऊ लागले की संघर्ष, प्रतिकार व युद्ध हे अवश्य आहे.

प्रश्न ५:– प्रेम, दया, वाटाघाटीने हृदयपालट होतो !

उत्तर– मुळीच नाही. घरगुती, कौटुंबिकसंबंधात प्रेम, दया, वाटाघाटींचा उपयोग होतो; राष्ट्रीयजीवनात मुळीच होत नाही. सुखासुखी, उगाच कोणी युद्ध करीत नाही. पाकिस्थानशी युद्ध टाळण्याचा यत्न १७ वर्षे झाला व शेवटी युद्ध झालेच. हृदयपालट, वाटाघाटीचे प्रयोग भारतात निष्फळ ठरले. युद्धामुळे काश्मीरचा प्रश्न १९४७ साली २ दिवसात सुटला असता तो १८ वर्षे झाली तरी संपत नाही. प्रेम, वाटाघाटी, हृदयपालटापेक्षा एक घाव दोन तुकडे, तडकाफडकी निकाल हाच श्रेयस्कर आहे.

प्रश्न ६:– भारतीय युद्ध न होते तर कोणाचेच नुकसान न होता प्राणहानी टळली असती.

उत्तर– भारतीय युद्ध न होते तर दुर्योधनादि हे मत्त, उन्मत्त, प्रगत होऊन त्यांनी आकांत मांडला असता. रावण, दुर्योधन, कीचक, कंस, चाणूरादींना जर त्या त्या वेळी नष्ट केले नसते तर त्यांनी आपल्या कुकर्माच्या सुधारलेल्या आवृत्या काढल्या असत्या. आसुरी वृत्ती अग्निज्वालेप्रमाणे भडकतच जाते युद्धामुळे प्राणहानी, परिमित होते तर त्याउलट पाकिस्थान निर्मितीच्या वेळी अगदी फुकट ३|४ लाख माणसे मेली व राष्ट्रिय संपत्तीची मोठी हानी झाली. साक्षात युद्धामुळे येवढी हानी झाली नसती.

प्रश्न ७:– आध्यात्मिक उत्कर्षास युद्ध अवश्य आहे काय ?

उत्तर– युद्ध म्हणजे एक कर्तव्य. प्रत्येक कर्तव्य हे ईश्वरार्पण बुद्धीने केल्यास ते चित्तशुद्धिद्वारा आध्यात्मिक उत्कर्षास कारण होते तोच न्याय युद्ध या कर्तव्याला लागू आहे.

प्रश्न ८:– इच्छा नसताना युद्धास प्रवृत्त करावे काय ?

उत्तर– अर्जुन युद्धाच्या इच्छेनेच आला होता. तो वीर, लढवय्या, व मर्द होता. त्याचा पिंड, त्याची प्रकृती युद्धाचीच होती. म्हणूनच शेवटी श्रीकृष्ण बजावतात की युद्ध नको म्हटलेस तरी तुझी प्रकृती तुला गप्प बसू देणार नाही. प्रकृतीच्या तडाख्याने जे तू युद्ध करणार ते स्वेच्छेने व विचाराने कर. एकदा सैन्यात भरती झाली की इच्छा संपली. रणांगणावर खडे राहिल्यावर Fire म्हटले की गोळीच घातली पाहिजे, तेथे विचार नाही. रिक्रूट भरती पूर्वी विचार करावा. युद्ध टाळण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ झाल्यावरच अर्जुन कुरुक्षेत्रावर स्वेच्छेनेच युद्धार्थ आला होता, तेथे त्याला कोणी धरून आणला नव्हता.

प्रश्न ९:– गीतेतील कर्तव्यप्रेरक कारणे पटत नाहीत.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उत्तर – आत्मा, अनात्मा, जीवेश्वरसंबंध, जगताचा व्यवहार, कर्मप्रक्रिया, पुनर्जन्म इत्यादि सर्व दृष्टीने अर्जुनाला कर्तव्य का करावे हे गीतेमध्ये तस्मात् हे पद अनेक ठिकाणी घालून पटवून दिलेले आहे.

कुरु कर्मैव तस्मात् त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥
तस्मात् असक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व ।

अर्जुनाच्या भूमिकेशी जे समान भौमिक व समानशील असतील त्याना गीतेतील सर्व विषय उत्तम समजेल. म्हणून ज्ञानेश्वरांनी प्रथमच श्रोत्यांना कोपरखळी दिली की अर्जुनाच्या ओळीला बसण्यायोग्य जे अधिकारी असतील, त्यानीच येथे बसावे, इतरानी उगाच येथे गर्दी न करावी.

प्रश्न १०:- अर्जुनाचा विषाद क्षणिक होता काय ?

उत्तर – तो विवेकजन्य नव्हता; वैतागयुक्त होता. म्हणूनच तो स्वतः म्हणतो, कार्पण्यदोषोपहतः स्वभावः ॥ कार्पण्य म्हणजे मनोदौर्बल्य या दोषाने व्याप्त अर्जुन होता. त्याचा विषाद अगदी क्षणिक होता.

प्रश्न ११:– श्रीकृष्णाने याचवेळी त्याला अहिंसा, भूतदया, प्रेम वगैरे शिकविणे इष्ट होते.

उत्तर– ते रणांगण होते; कॉलेजचे व्यासपीठ नव्हते. तेथे १८ अक्षौहिणी सैन्य मरण मारणाच्या ईर्ष्येने आले होते. त्यावेळी प्रवचन, व्याख्यानाचा प्रसंगच नव्हता. अर्जुनाच्या शंकांचे निरसन १०।१५ मिनिटात झाले व तो नष्टसंदेह होऊन युद्धास प्रवृत्त झाला. येथे ७०० श्लोकांची १ तासाभराची गीता सांगितलेली नाही. तर ती पुढे व्यासांनी केली आहे.

प्रश्न १२:– श्रीकृष्णाने युद्धास प्रवृत्त करण्यास नको होते.

उत्तर– तर काय संन्यास घे, धनुष्य टाक, भीक माग असे सांगणे इष्ट होते. ते सर्व तो करू इच्छित होता; ते सांगण्याची गरज नव्हती. समजा जर अर्जुन युद्ध न करिता जाता तर त्याच्या फटफजीतीला अंत नव्हता. दुर्योधनादि चंडाळांनी अवाच्य निंदा केली असती व ही तृतीय प्रकृतीची जात म्हणून जगात छीः थू केली असती. मग कुठले भारत, कोठची गीता व कोठची 'गीतेची भूमिका', जग एका उत्कृष्ट इतिहासग्रंथाला व तत्त्वज्ञानाच्या ग्रंथाला मुकले असते.

प्रश्न १३:– युद्धाचे शास्त्रीय विवेचन हवे होते.

उत्तर– अर्जुनाला ते सर्व माहीत होते. डिफेन्स ॲकॅडमीमध्ये कृष्णार्जुन हे गुरुशिष्य नात्याने तेथे आले नव्हते.

प्रश्न १४:– व्यक्तिस्वातंत्र्य, चातुर्वर्ण्य व युद्ध.

उत्तर– याविषयी लेखकांनी पुन्हा पुन्हा घोळवून लिहिलेले सर्व निरर्थक आहे. कारण आज वर्णव्यवस्था नाही. ती पूर्वी मंत्रकालामध्ये होती. आता आपण मंत्र व तंत्र काल ओलांडून यंत्रकालामध्ये आलो आहो. कोणतीही समाजरचना सदोषच असते. तथापि माणसाला कर्तव्य असते. ते त्याने सहज, स्वभावज, व स्वभावनियत पद्धतीने करावे एवढेच गीता सांगते. अर्जुनाच्या जागी अन्य कोणी असता तरी कृष्णाने त्याला प्राप्त कर्तव्य करण्याचाच उपदेश केला असता. 'तस्मात् असक्तः सततं कार्यं कर्म समाचर' सदैव अनासक्त बुद्धीने निरहंकार वृत्तीने कर्तव्य कर हाच मनुष्यमात्राला उपयुक्त असा संदेश आहे.

प्रश्न १५:– खुनी मनुष्यही आत्म्याला मारीत नाही, असे म्हणेल.

उत्तर– उदाहरण चुकीचे. खून करणाऱ्याची वृत्ती व युद्धार्थ समोरासमोर लढणाऱ्याच्या वृत्तीमध्ये फार फरक आहे. अर्जुन हा द्रोणादींच्या वधाला भीत होता, पापाला भीत होता; त्याकरिता ते तत्त्वज्ञान सांगितले. श्री. खैरकर यांच्या लेखामध्ये याच तऱ्हेचे आणखी ४।५ आक्षेप आहेत. पण विस्तारभयास्तव त्यांना उत्तरे दिली नाहीत. वाचकांना शितावरून भाताची परीक्षा करिता येईल असे म्हणून रजा घेतो.

**महादेवशास्त्री दिवेकर**

---



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सार-संकलन

## पश्चिम आशियातील युद्ध

इस्रायलच्या जीवनातील तो दिवस महत्त्वाचा ठरला ! सकाळी ८ वाजता जेरुसलेमच्या दक्षिणेस युध्द सुरू झाल्याची बातमी आकाशवाणीने दिली. युद्धातील पहिली गोळी इजिप्तने झाडली असेही टामपणे सांगण्यात आले. ( इस्रायलमध्ये अजूनही तसेच प्रतिपादण्यात येते. 'नासेरने आपली काचेची हनुवटी पुढे केली आहे हे आम्हाला तरी काय माहीत,' असे इस्रायलच्या टँक कमांडरचे म्हणणे. )

११ बाजता दोन्ही बाजूच्या सैन्यात तुंबळ युद्ध जुंपले. कारण वर्षानुवर्षे दोन्ही बाजूंनी मान्याच्या जागा हेरून ठेवल्या होत्या. जॉर्डनचे सैन्य याच वेळी टेल-एवीव्हकडे निघाले व त्यांनी संयुक्त राष्ट्रसंघाचे सैनिक रहात असलेली इमारत काबीज केली. सुवेझ आणीवाणीपेक्षाही हा प्रसंग जास्त गंभीर आहे हे जेरुसलेमच्या नागरिकांचे लक्षात येण्यास वेळ लागला नाही. ४ वाजता आपण जिंकलो आहोत याबद्दल ज्यूंना खात्री पटली. आपण इतक्या तडकाफडकी जिंकू असे मात्र त्यांना वाटले नव्हते. या विजयाच्या निमित्ताने होणान्या समारंभाचे वेळी तीन नव्या मंत्र्यांचा शपथविधी करण्याचे ठरले. दोघांनी शपथा घेतल्या पण मॉशे दयान फारच कामात असल्यामुळे त्यांचा शपथविधी राहून गेला. इस्रायली जनरल्सनी नम्रतेचा आव आणला तरी त्यांच्या तोफखान्याने जॉर्डनी सैन्याची धूळधाण उडवली. संयुक्तराष्ट्रसंघाच्या सैनिकांना त्यांनी मुक्त केले. टेल-एवीव्हचे रस्ते लष्करी वहानांनी गच्च भरले होते. आपण शत्रूंची ३७४ विमाने पाडली यांचा नेसेटमध्ये जमलेल्या राजकीय नेत्यांना सुगावा होता. संध्याकाळपर्यंत जुन्या जेरुसलेमला वेढा पडला. आगीचे लोळ सर्वत्र उठले. अरबांची परिस्थिती केविलवाणी झाली.

इस्रायलने आपल्या कुशल संघटणाचातुर्याने युद्ध जिंकले. संयुक्त राष्ट्र संघाच्या एका प्रवक्त्याचे म्हणण्याप्रमाणे इस्रायलची हवाई संरक्षण संघटणा जगात सर्वात उत्तम आहे. त्यांचेपेक्षा जास्त चांगली संघटणा आजतरी दुसरे कोणाजवळ नाही. तीच गोष्ट टँक व लष्करी गाड्यांची. "आम्हाला अरबांना धडा शिकवावयाचा आहे; आणि त्याची आठवण १०।२० वर्षात न बुजता जन्मभर राहील असा धडा शिकवावयाचा आहे," एवढेच इस्रायलचे म्हणणे.

अडीच कोटी लोकांनी सर्व अरब जगाला एवढ्या थोड्या वेळात जिंकणे म्हणजे सामान्य गोष्ट नाही. अमेरिका व ब्रिटन इस्रायलला मदत करीत आहे अशी ओरड नासेरने करण्यास सुरवात केली तेव्हाच इस्रायलची सरशी झाली हे सिद्ध झाले. इस्रायलचे हे यश त्यांचे डोक्यात जाईल का ? शंकाच आहे. कारण ज्यू लोक मोठे शांत डोक्याचे आहेत. एखोल यांचे म्हणण्याप्रमाणे त्यांना अरबी मुलूख नको आहे. जॉर्डनने जेरुसलेममध्ये काढलेल्या कुरापतीचा थोडाफार परिणाम होईल हे मात्र नक्की.

गेल्या आठवड्यात इस्रायलमध्ये असलेल्या प्रत्येकास त्या राष्ट्राचे प्रौढत्त्व जाणवल्याखेरीज राहिले नसेल. त्याचप्रमाणे त्यांचेतील राष्ट्रीयत्वामुळे निर्माण झालेली एकता व कार्यक्षमता यांची पण प्रचीती आली असेल. परंतु इस्रायलच्या अंतस्थ परिस्थितीबद्दल कोणालाच शंका नव्हती. त्यांची आर्थिक व राजकीय परिस्थिती थोडीफार गोंधळात होती. राजकीय नेतृत्वात बदल होण्याची शक्यता दिसून येते. तरुण पिढीने दाखवलेली धमक विचारात घ्यावी लागेल. पण एक गोष्ट मात्र जगाच्या निदर्शनास आली व ती म्हणजे इस्रायल कोणाच्याही डोळ्यास डोळा भिडवू शकतो. आज ज्यू लोकांचा जगाला हेवा वाटत आहे ?

## अरबांचे शवविच्छेदन

या युद्धाची जबाबदारी अनेकांना घ्यावी लागेल. अध्यक्ष नासेर यांनी मात्र इस्रायलला खोटाच दम देऊन लढाई करणे भाग पाडले असे म्हणावे लागेल. दोन वर्षापूर्वी अरब जगाची फारशी तयारी नव्हती याची जाणीव ठेवून नासेरने पुढाकार घेऊन त्यांना









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

युद्धापासून परावृत्त केले होते. पण यावेळी मात्र त्याचा तोल सुटला त्यामुळे दोन वर्षापूर्वी अस्तित्वात नसलेले काहीतरी घडले असेल असे प्रत्येकास वाटणे साहजिकच आहे. नासेरला आपल्या शक्तीची व इस्रायलच्या प्रतिकाराची कल्पना आली नाही. ही चूक एखादा राष्ट्रीय नेता पचवू शकेल का ?

नासेरने कितीही चुका केल्या असल्या तरी आज तरी अरब जगाला एकत्र बांधणारा दुसरा नेता दिसत नाही. आणि या पराजयानंतर तर सर्वांना एकत्र ठेवणाऱ्या नेत्याची फारच गरज आहे. आतापर्यंत नासेरने हे काम चोख केले आहे. दुसरे म्हणजे इजिप्तमध्येसुद्धा आज नासेरची जागा घेईल असा पुढारी दिसत नाही. गेली पंधरा वर्षे नासेरने इजिप्तला स्थैर्य मिळवून दिले आहे. आणि या लढाईमुळे जर इजिप्तमध्ये अंतःकलह निर्माण झाला तर नुसत्या इजिप्तच्या दृष्टीनेच नव्हे तर सर्व अरबराष्ट्रांच्या दृष्टीने ती शोकांतिका होईल. सर्व अरबराष्ट्रांवर त्याचा विपरीत परिणाम होईल.

या युद्धाचा अरबराष्ट्रांवर दूरगामी परिणाम होणार आहे. अरब ऐक्य विस्कळित होण्याचा फार मोठा संभव आहे, राजा हुसेन व त्याचे सैन्य जरी निकराने लढले असले तरी जेरूसलेम पडले याचा परिणाम हुसेनला भोगावाच लागणार. हुसेनच्या डोक्यासाठी टपलेले अरब थोडे नाहीत. आणि संकटकाळी व्यक्ति वा समुदाय यांचेतील चांगुलपणा क्वचितच उफाळून येतो. सिरियन आघाडीवरील बातम्या फारशा स्पष्ट येत नसल्या तरी त्यांचा प्रतिकार वा चढाई फारशी परिणामकारक ठरली नाही हे स्पष्ट आहे. इराक युद्धभूमीपासून लांब असल्यामुळे त्यांचेवरील जबाबदारी मर्यादित होती. तरीसुद्धा त्यांचे वैमानिकदलाबद्दल प्रश्न उपस्थित होईलच. सौदी अरेबिया, कुवेत व सुदान ही राष्ट्रे मात्र फारशी दोषास पात्र ठरणार नाहीत असे वाटते.

अरबजगाची मनःस्थिती अत्यंत वाईट आहे. ते खूपच चिडलेले आहेत. ब्रिटन व अमेरिका याचेवर इस्रायल इतकाच त्यांचा रोष आहे आणि तो नजीकच्या भविष्यात नाहीसा होईल अशी परिस्थिती नाही. अमेरिका व ब्रिटन यांनी इस्रायलच्या लष्कराला हवाई संरक्षण दिले किंवा नाही हा वादाचा प्रश्न असला तरी राजनैतिक दृष्टचा त्यांचा इस्रायलला पूर्ण पाठिंबा होता हे स्पष्ट होते. व म्हणूनच अरबाचे व त्यांचे संबंध सुधारणे फार कठीण होणार आहे.

### अमेरिकेचा थंडावा

'आम्ही विचाराने, बोलण्याने व कृतीने तटस्थ आहोत.' असे अमेरिकन स्टेट डिपार्टमेंटने जाहीर केले. पहिल्या महायुद्धाचे वेळची अध्यक्ष विल्सनची हीच घोषणा होती याची अनेकांना आठवण झाली. अमेरिकेचे सहावे आरमार लढाईच्या क्षेत्रापासून ४०० मैलावर उभे होते. नेहमीप्रमाणे त्यांचेवर नजर ठेवणारे रशियन जहाज पण जवळपासच होते. त्यामुळे अमेरिकेने इस्रायलला हवाई संरक्षण दिले यात तथ्य नाही हे कमितकमी रशियन्सना तरी माहीत आहे. ही दोन बडी राष्ट्रे आंतरराष्ट्रीय परिस्थितीतील आणीबाणीमुळे या वेळी एकत्र आली. ब्रेझनेव्ह व कोसिगीन यांचे सरकारला पहिल्यानेच अशा आणीबाणीस तोंड द्यावे लागत आहे. क्रुश्चेव्ह व केनेडी या जोडीने क्यूबाचा प्रश्न युद्ध होऊ न देता सोडवला होता; आणि आता युद्ध झाले तरी महायुद्ध टाळण्यात रशिया अमेरिकेला यश मिळाले आहे असे म्हणण्यास हरकत नाही.

इस्रायलच्या अस्तित्वास असलेला धोका अमेरिका तटस्थ म्हणून पाहू शकत नव्हती, तर इस्रायलबरोबर वैर असून सुद्धा त्याचे अस्तित्व मानल्याखेरीज रशियाला गत्यंतर नव्हते. जॉन्सन कोसिगीन यांचे याबाबत बोलणे झाले हे निश्चित.

अमेरिकेत अरबांचे बद्दल प्रेम असलेले फारसे लोक नाहीत. त्याउलट अमेरिकेत जवळ जवळ ५७ लक्ष संघटित ज्यू आहेत. ते सुशिक्षित, राजकीय दृष्टचा जागरूक, सार्वजनिक कामात भाग घेणारे व सढळ हाताने पैसा खर्च करणारे आहेत. त्यांचा बहुतांशी डेमोक्रॅटिक पक्षाला पाठिंबा असतो त्यामुळे राजकीयदृष्टचा इस्रायलबद्दल तटस्थतेचे धोरण स्वीकारणे अमेरिकेला जड जाते.

### ब्रिटनचे मनोगत

ब्रिटिश सरकारने दोघापैकी कोणाचीही बाजू न घेण्याचा व संयुक्त राष्ट्रसंघाच्या साहाय्याने युद्ध








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तहकुबी घडवून आणण्याचा निर्णय तावडतोब घेतला. पार्लमेंटमध्ये या युद्धाबद्दल अनेक मतप्रणाली अस्तित्त्वात आहेत व अरबांची बाजू घेणारे व ज्यूंना पाठिंबा देणारे सभासद सभागृहाच्या दोन्ही बाजूंना सापडतात. वैयक्तिकरीत्या ब्राऊन अरबांचे बाजूला असून विल्सन इस्रायलच्या बाजूला आहेत असे बोलले जाते. परंतु त्यातही जो कमजोर असेल त्याची बाजू घ्यावी असे काही ब्रिटिश खासदारांना वाटते व त्यामुळे अरबांचे बाजूला अनेक मते वळत आहेत असे वाटते. परंतु येनकेनप्रकारे युद्ध थांबवणेच ब्रिटनला योग्य वाटत होते.

### केळ्याच्या सालीवरील रशिया

युद्धात पडावे की न पडावे याबद्दल सुरवातीला क्रेमलीनमध्ये गंभीर चर्चा सुरू झाली. ब्रिटिश व अमेरिकन हवाई संरक्षणाच्या अफवा म्हणजे रशियाला आव्हान होते. परंतु क्रेमलीनने इजिप्तची सूचना बाजूला सारून युद्धतहकुबीस पाठिंबा दिला. त्यामुळे रशियाच्या दृष्टीने पश्चिम आशियात अनेक नवे प्रश्न निर्माण झाले. नासेरने युद्धभूमीवर घालवलेली पत राजनैतिक पातळीवर परत मिळविणे जरूर झाले आहे. तर दुसरे बाजूस इजिप्त व सिरिया येथे अस्तित्वात असलेल्या रशियाला पाठिंबा देणाऱ्या राजवटी टिकवून धरण्याची जरूरी निर्माण झाली आहे. स्टालीनच्या मृत्यूपर्यंत हा मुलूख अँग्लो अमेरिकन वर्चस्वाखाली होता. ती परिस्थिती गेल्या पंधरा वर्षात बदलली आहे. इस्रायल सिरियावर हल्ला करील असे त्यांना कदाचित् वाटलेही असेल. अकाबाचे आखात बंद करण्याच्या इजिप्तच्या कल्पनेला त्यांनी पाठिंबा दिला असेल वा नसेल पण या सर्व प्रकरणात रशियाला स्वारस्य होते येवढे नक्की.

अकाबाचे आखात बंद करणे म्हणजे इस्रायलला नामशेष करणे नव्हते. इस्रायलचे अस्तित्त्व टिकवून धरणे रशियाला फायद्याचे आहे. माणुसकीच्या तत्त्वावर नव्हे तर अरबजग व अमेरिका यांतील भांडणाचे कारण म्हणून इस्रायलचे अस्तित्त्व त्यांना टिकवावयाचे आहे. त्याचप्रमाणे इस्रायलला हात लावण्याचा प्रयत्न केल्यास त्याचा युरोपवर म्हणजे पर्यायाने युरोपिअन कम्युनिस्ट पक्षावर परिणाम होईल हे रशिया ओळखून आहे. त्यातच इस्रायलचा खरोखरच पराजय होत आहे असे वाटल्यास अमेरिका नक्की युद्धात पडेल अशी रशियाची खात्री होती. नासेरला जर या युद्धात प्रतिष्ठेपुरताही जय मिळाला असता तर या आघाडीखेरीज व्हिएट-नामची आघाडीही महत्त्वाची आहे असे अमेरिकेला बजावण्याचा मोका रशियाला मिळाला असता.

परंतु इस्रायलच्या विद्युत्वेगी आक्रमणाने व विशेषतः त्यांच्या विमानदलाच्या तडाख्याने रशियाचे सर्व आडाखे चुकीचे ठरले. युद्धात भाग न घेण्याचे तर त्यांनी ठरविलेच पण तावडतोब युद्ध-तहकुबी झाली पाहिजे म्हणून घोषणा केली. रशियाने शांततेच्या बाजूने कौल दिला आहे. परंतु राजनैतिक पातळीवर झालेल्या पराजयाचा वचपा काढण्याचा ते प्रयत्न करतील असे दिसत आहे. अमेरिकेलाही आपण जास्त ओढून धरण्यात अर्थ नाही हे समजले आहे. दोन बडी राष्ट्रे समझोता करण्यास तयार असल्यामुळे लवकरच त्यासाठी परिषद भरेल असे वाटते. आणि इस्रायलच्या अस्तित्वाने निर्माण झालेल्या अनेक प्रश्नावर खुली चर्चा होईल असे वाटते. व्हिएटनामी युद्ध चालू नसते तर सर्व काही ठीकठाक झाले असते असे म्हणावयास पण जागा झाली असती.

परंतु रशियाचे हात आज भरलेले आहेत. त्यांचे धोरणास अरबांचा पाठिंबा मिळाला नाही. उलट मॉस्कोतील अरब वकिलांनी रशियाला जाब विचारण्यास सुरवात केली तर चीनी वकीलाने इजिप्तमध्ये त्या धोरणाचा निषेध केला. आपले धोरण सरतेशेवटी अरबांच्या कल्याणाचे आहे ही गोष्ट पटवून देणे रशियाला भाग पडत आहे, दुसरे बाजूस व्हिएट-नामचे युद्ध चालू असतानाच अमेरिकेशी वाटाघाटी करण्यास त्यांना तयार व्हावे लागणार आहे. थोडक्यात म्हणजे पश्चिम आशियातील रशियाचे प्रश्न गुंतागुंतीचे होत आहेत.

### इस्रायलचे लष्करी संघटण

युद्धाला तोंड पडले आणि इस्रायलची सर्व शक्ति कामास लागली. १९५६ पेक्षाही जलद गतीने








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लष्करी संघटण अस्तित्त्वात आले. दोन लक्ष सैनिकांना तावडतोव बोलावण्यात आले. चोवीस तासाचे आत प्रत्येकजण आपआपल्या तुकडीत सामील झाला. या सर्वांचे मागे अनेक वर्षाचे संघटण व चातुर्य होते हे सांगणे नकोच. प्रत्येक इस्रायली माणसास आपण कोणत्या तुकडीतील सैनिक आहोत हे माहीत आहे. त्याचप्रमाणे आपण हजर होताना काय सामान बरोबर न्यावयाचे याचीही त्याला माहिती आहे. पहिल्याप्रथम दळणवळणाला प्राधान्य देण्यात आले. सर्व मोटारी व बसेस लष्कराच्या दिमतीस दाखल झाल्या. अधिकाऱ्यांना टेलिफोन-वरूनच बोलावण्यात आले, प्रत्येकाला आपल्या हाताखालची माणसे संघटित करण्यास सांगण्यात आले; कारण ही माणसे त्यांच्या परिचयाची होती. प्रत्येकाला एक वर्ष लष्करीशिक्षण सक्तीचे आहे. रिझर्व सेना जेरूसलेममध्ये काही तासांच्या अवधीतच मोक्याच्या ठिकाणी येऊन दाखल झाली.

वाहेरच्या अनेक लोकांना वाटत होते की इस्रायल लढाईत थोडे दिवसच टिकाव धरू शकेल. पटकन संपणारे युद्ध इस्रायलच्या पथ्यावर असले तरी लांबणाऱ्या लढाईला अरबांचे पेक्षा त्यांनी जास्त दिवस टिकाव धरला असता हे नक्की. त्यांची सर्व संघटना लांबवर चालणारे युद्ध लक्षात ठेवून केलेली आहे. या युद्धात बोलावण्यात आलेले दोन लक्ष लोक म्हणजे रिझर्व सेनेचा चौथा हिस्सा होय. जरूरीच्या धंद्यातील लोकांना बोलावण्यात आलेच नाही. निर्यात व्यापारी संघटणेतील अधिकारीही बोलावण्यात आले नव्हते. उत्पादनाला या लढाईने थोडासुद्धा धक्का पोचला नाही.

अन्नधान्यात इस्रायल स्वयंपूर्ण आहे. गेल्यावर्षी फक्त ३६ मिलियन डॉलर्सचे अन्न आयात करण्यात आले. म्हणजे दर डोईस दर साल फक्त १४ डॉलर्सचे अन्न. तेलाचे बाबतीत पण त्यांची परिस्थिती चांगली होती. इलियाट ते हैफा या एकाच पाइप लाइन मध्ये १० दिवसांचे तेल शिल्लक होते. दुसरे साठे पण भरलेले होते. आता तर कसलीच पंचाइत नाही.

## मध्य आशियाचे अर्थशास्त्र

### राष्ट्रीय उत्पन्न

| राष्ट्र | लोकसंख्या ( दशलक्ष ) | एकूण राष्ट्रीय उत्पन्न ( पौंड ) | | एकूण दर-डोई उत्पन्न |
|---|---|---|---|---|
| इजिप्त | ३०·१ | १·३६ | बिलियन | ५१ पौंड |
| इराक | ८·३ | ०.६३ | ,, | ७५ पौंड |
| सौदीअरेबिया | ६·६ | ०·५४ | ,, | ८२ पौंड |
| सिरिया | ५·६ | ०·३४ | ,, | ६० पौंड |
| इस्रायल | २·६ | १·२८ | , | ४८८ पौंड |
| जॉर्डन | २·० | ०·१६ | ,, | ८० पौंड |

तेल ही अरब राष्ट्रांच्या अर्थशास्त्राची गुरु-किल्ली आहे. ब्रिटनचे ७२ टक्के तेल या देशांतून येते. कुवेत, लिबीया व इराक हे मुख्यत्त्वेकरून तेल उत्पादनाचे देश आहेत.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे पौंडी गंगाजळी होय. युद्धामुळे ब्रिटनचे या बाबतीत जास्त नुकसान होणार असले तरी अरब राष्ट्रांना पण झळ लागल्या-खेरीज रहाणार नाही. युरोपिअन राष्ट्रांच्या दृष्टीने अरब बाजारपेठ महत्त्वाची आहे. व त्यातही ब्रिटनचा वाटा मोठा आहे. बहुतेक सर्व अरब राष्ट्रे तेलाचे भरपूर उत्पादन करीत असली तरी ती मागस राष्ट्रातच गणली जातात. त्या उलट इस्रायल सर्व दृष्टीने आधुनिक व औद्योगिक दृष्ट्या पुढारलेले राष्ट्र आहे.

—दि इकॉनॉमिस्ट लंडन; १० जून १९६७

## ऐक्याच्या शोधात

गेली कित्येक वर्षे जागतिक कम्युनिस्टांची शिखर-परिषद भरविण्याच्या खटपटीत सोविएट नेते गुंतलेले आहेत. तथापि अजून शिखराच्या दिशेने त्यांची मुळीच प्रगती झालेली नाही. स्टेजवरून मुळीच न हालता "जातो मी, जातो मी" असे पुनःपुनः आळविणाऱ्या नटासारखीच ही अवस्था आहे. बरेच दिवस होऊ घातलेल्या या शिखरपरिषदेच्या दिशेने, गेल्या महिन्याच्या अखेरीस पूर्व व पश्चिम युरोपमधील २४ कम्युनिस्ट पक्षांची कार्लोवी वेरीची परिषद हा मधला टप्पा ठरेलशी अपेक्षा होती; तथापि ती परिषद संपताच सोविएट नेते आपल्या उद्दिष्टांपासून पूर्वी इतकेच दूर असल्याचे स्पष्ट









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

झाले. नंतर जगात सर्वत्र कम्युनिस्टांनी ऐक्याचा निदर्शक म्हणून " मे दिन " साजरा केला. तथापि त्यांचे जागतिक आंदोलन गेल्या कित्येक वर्षांपासून अप्रगल्भच राहिले आहे. येत्या सहा महिन्यात सोविएट राज्यक्रांतीचा पन्नासावा वर्धापन दिन साजरा व्हायचा आहे; तथापि त्या समारंभाला जोडून शिखरपरिषद भरू शकेल अशी चिन्हे मात्र फारशी दिसत नाहीत.

एक काळ असा होता की जागतिक कम्युनिस्ट पक्षांना स्टालीन हवे तसे वळण देई. तथापि आता परिस्थिती पुष्कळच बदलली आहे. युरोपमधील कम्युनिस्ट पक्षांची परिषद भरविणे हाच आता सोविएट नेत्यांना मोठा विजय वाटतो. महत्वाच्या कम्युनिस्ट पक्षांपैकी केवळ युगोस्लाव्ह व रुमानियन पक्षांनीच या परिषदेवर बहिष्कार घातला होता. इतर काही पक्षांना, विशेषतः इटालियन पक्षाला परिषदेत चीनविषयी कसलीही चर्चा होणार नाही असे आश्वासन देऊन उपस्थित राखण्यात आले होते. आणि मुख्य युरोपीय प्रश्न म्हणजे जर्मनीचा. त्याबाबत रशियन पक्षाची भूमिका " दादागिरीची" नव्हती. पूर्व युरोपीय पक्षांच्या भूमिकात मेळ घालण्यासाठी मध्यस्थाचे काम तो करीत होता.

नव्या पश्चिम जर्मन सरकारने रुमानियाशी राजनैतिक संबंध प्रस्थापित करून जो राजकीय विजय मिळविला त्याने हेर उलब्रिच प्रमाणेच पोलंडचे गोमुल्कापण घाबरून गेले. व आपल्या धोरणाला झेकोस्लाव्हाकिया व रशिया यांचा पाठिंबा मिळविण्याचा त्यांनी कसून प्रयत्न केला. कार्लोवी वेरी येथील परिषदेनंतर बॉनशी संबंध जोडण्याचे प्रयत्न इतर पूर्व युरोपिअन राष्ट्रांनी केले नाहीत. हंगेरी व बल्गेरिया यांना रुमानियाचे नेतृत्व स्वीकारण्यापासून परावृत्त करण्यात रशियाला यश मिळाले आहे असे वाटते. यावरूनही रशियाचा कम्युनिस्ट जगातील प्रभाव कसा मंदावत आहे हे स्पष्ट होते.

मॉस्कोने पूर्व युरोपातील आपल्या धोरणात शक्तिपेक्षा आर्जवाचा उपयोग केल्यास वॉर्सा करारातील राष्ट्रसमूहातील राष्ट्रांपैकी फक्त रुमानिया तेवढा वेगळा पडेल. त्याच मार्गाने इटली व फ्रान्समधील कम्युनिस्टांशी मॉस्कोला समझोता करता येईल. कारण हे दोन प्रचंड कम्युनिस्ट पक्ष रशियाच्या संपूर्ण कावूत रहाणे अशक्यच आहे. गॉलिझमचा पुरस्कार करणारा फ्रेंच कम्युनिस्ट पक्ष ब्रेझ्निनॉव्ह व कोसिजीन यांचेकरता आपले पंख कापणार नाही हे स्पष्ट झालेले आहे. परंतु भांडवलशाही जगाबरोबर सहजीवन जगण्याच्या तत्त्वाला पाश्चिमात्त्य कम्युनिस्ट पक्षाचा विरोध नाही. ते पक्ष लोकशाही समाजवादी पक्षांशी सहकार्य करण्याचा प्रयत्न अनेक ठिकाणी करीत आहेत.

आशिया व लॅटीन अमेरिका या दोन भूखंडात मात्र क्रांतिकारक मार्गाचा अवलंब करून सत्ता काबीज करण्याची शक्यता आज कम्युनिस्ट पक्षांना दिसत आहे. आणि म्हणूनच याच प्रदेशातून स्टालीनच्या कारकीर्दीत कधीही न उडणारे खटके मॉस्को व तेथील स्थानिक कम्युनिस्ट पक्ष यात उडत आहेत. आजच्या सोव्हिएट नेत्यांना या परिस्थितीशी जुळते घेणे भाग पडत आहे. क्युबन क्रान्तीत नाहीसा झालेला हिरो चे गुव्हारा याच्या नावाने प्रसिद्ध करण्यात आलेल्या संदेशावरून परिस्थिती स्पष्ट होत आहे. या संदेशात " जगातील नागावलेल्या सर्व राष्ट्रांना अमेरिकन साम्राज्यशाहीशी जगव्यापी युद्ध पुकारण्याचे आव्हान देण्यात आलेले आहे. अगणित व्हिएटनामना तोंड देण्याची अमेरिकेची ताकद नाही असेही त्यात स्पष्ट म्हटले आहे. या संदेशाचा गर्भितार्थ एकच आहे व तो म्हणजे " व्हिएटनाममध्ये अमेरिकेशी लढा देऊन त्याचवेळी जिनिव्हात शांततेची बोलणी चालू करणे बरोबर नाही. " या दुतोंडीपणाचा आरोप चीनने क्रुश्चेव्ह व त्यांचे वारसदार यांवर वारंवार केलेला आहे.

साम्राज्यशाही विरोधी लढयात पेकिंगच आपली बाजू बरोबर सांभाळीत नाही असा सोव्हिएट नेत्यांचा दावा आहे, " व्हिएटनामी जनतेला मदत करण्यास चीनसुद्धा सर्व समाजवादी राष्ट्रे एकत्र आली असती तर साम्राज्यशाहीचा पराभव कितीतरी लवकर झाला असता " असे उद्‌गार मे दिनाच्या संचलनाचे दिवशी सोव्हिएट संरक्षणमंत्री मार्शल ग्रेचको यांनी काढले. पेकिंगच्या राजकीय हटवादीपणामुळे रशियाला व्हिएटनामला मदत









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करीत असतानाच वाशिंग्टनशी चांगले संबंध ठेवता आले आहेत. व्हिएटनामचे युद्ध जोरात सुरू झाल्यावर तरी रशिया व चीन एकत्र यावयास पाहिजे होते. परंतु या दोन राष्ट्रातील झगडा आता नुसता तत्त्वाचाच राहिलेला नाही. व्हिएटनाममध्ये पेटणारे युद्ध म्हणजे रशियाशी संबंध तोडण्याचा मोका असे तरी पेकिंगला वाटत असले पाहिजे किंवा जागतिक कम्युनिस्टांच्या दृष्टीत रशिया म्हणजे अमेरिकेचे हस्तक आहेत असे सिद्ध करण्याची ही संधी आहे.

एकवेळ एकसंघ असलेली जागतिक कम्युनिस्ट चळवळ पुन्हा सांधण्याच्या रशियाच्या प्रयत्नात दोन बाजूने अडथळे उत्पन्न केले जात आहेत. एका बाजूस नव्याने स्वतंत्र झालेले पश्चिम युरोपातील कम्युनिस्ट पक्ष चीनला एकमुखाने दोषी ठरविण्यास तयार नाहीत. कारण तसे केल्याने भविष्यात दुसऱ्या एखाद्या बंडखोर कम्युनिस्ट पक्षाबद्दल निर्णय घेण्यास ते उदाहरण म्हणून वापरले जाण्याची शक्यता निर्माण होईल. त्याचप्रमाणे त्यांच्या स्थानिक अनुयायांची या गोष्टीस संमती मिळेलच अशीही खात्री त्यांना देता येणार नाही. इटलीतील कम्युनिस्ट पक्षाच्या सभासदांनी या प्रश्नावर पक्ष विभागला जाण्याची शक्यता स्पष्ट केलीच आहे. दुसऱ्या बाजूस आशिआयी कम्युनिस्टपक्षांच्या विचारास प्राधान्य देणे आज जरूर आहे. जोपर्यंत व्हिएटनाम प्रकरण चालू आहे व रशिया व अमेरिका यांचेतील समझोत्याचे दृश्य आशिआयी जनतेच्या डोळ्यासमोर आहे तोपर्यंत पेकिंगने केलेले दोषारोप खोडून काढणे रशियाला अशक्य होणार आहे. म्हणून कम्युनिस्ट शिखर-परिषदेला हनोईने मान्यता दिल्याखेरीज बहुसंख्य आशिआयी पक्ष त्यात भाग घेणार नाहीत. आणि हनोईने कधीकाळी अशी मान्यता दिली तरी ती वेळ आजची नाही हे नक्की.

आतापर्यंत रशियन नेते कुंपणावर बसण्याची कसरत करीत आहेत. काही रशियन नेत्यांना तरी क्रुश्चेव्हची बाजू घेऊन आर्थिक व सामाजिक विकासाकडे जास्त लक्ष द्यावेसे वाटते. त्याच प्रमाणे कम्युनिस्ट युरोपची एक सामायिक बाजारपेठ निर्माण करण्याकडे पण त्यांचा कल झुकत आहे. परंतु या मार्गात काही अंशी तरी अमेरिका व प. युरोप यांचे सहकार्याची जरूरी वाटेल व त्याची किंमत म्हणून 'राष्ट्रीय विमोचन' लढ्यांना देण्यात येणारा पाठिंबा कमी करावा लागेल. हा मार्ग आक्रमण्याचा निर्णय जर रशियन नेत्यांनी घेतला तर ते सुधारणावादी कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या दृष्टीने वाटचाल करतील व पेकिंग म्हणजे जातिवंत क्रान्तिकारकांची मक्का बनेल. परंतु आपल्या क्रान्तीच्या पन्नासाव्या वाढदिवशी हा निर्णय अंमलात आणण्यास सुरवात करून आपल्या जन्मसिद्ध हक्कांवर पाणी सोडणे रशियन नेत्यांना सोपे जाणार नाही.

व्हिएटनाममधील युद्ध जर आणखी पेटले तर शिखर परिषद बोलावण्याची उत्सुकता मावळून जाईल. पहिल्याने त्यांना आपसात विचारविनिमय करून ठाम निर्णय घ्यावा लागेल. त्यानंतरच आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीचा पाठिंबा ते मिळवू शकतील. कार्लोवी वेरीपासून मास्को 'बहोत दूर आहे.' व सहा महिन्याचा कालावधी फार अल्प ठरणार आहे. धुळीने माखलेला भूतकाळ घासून पुसून स्वच्छ करून स्वच्छ व लख्ख भविष्याची वाट दाखवण्यास तो अपुरा आहे.

–दि इकॉनॉमिस्ट, ६ मे १९६७

## थायलंडचे स्वावलंबन

" माझे काम खूप विशाल, आशादायी व साहसी आहे. विशेषतः आता बऱ्याच गोष्टी आमच्या सारख्या होत असल्यामुळे मला ते खूप आवडते" असे उद्गार थायलंडमधील एका बड्या सरकारी मुलकी अधिकाऱ्याने चांगल्या जेवणानंतर तृप्त झाल्यावर काढले. कदाचित जगातील कोणत्याही राष्ट्रातील उच्च दर्जाचा चांगला सरकारी नोकर असे उद्गार काढू शकेल. परंतु फारच थोड्या राष्ट्रांच्या वाटेत थायलंडसारखे धोके अस्तित्वात असतील किंवा क्वचितच राष्ट्रांना भविष्यकाळ इतका अशादायी वाटत असेल.

अतिपूर्वेकडील दोन फार मोठ्या दुर्दैवी घटनांमुळे थायलंड आर्थिक विकासाच्या मार्गास लागला. पहिली म्हणजे व्हिएटनाममधील युद्ध. श्रीमंत राष्ट्रे





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मूर्ख आहेत. युद्ध चालू असल्याखेरीज ती राष्ट्रे आपल्या मित्रराष्ट्रांना खरी मदत देत नाहीत. थायलंड सध्या अमेरिकन युद्धातील आघाडीचा लष्करी तळ आहे. त्यामुळे लष्कराच्या पाठोपाठ अमेरिकेतील उत्कृष्ट मुलकी इंजिनिअरिंग व तंत्रविद्या थायलंडमध्ये अवतीर्ण होत आहे. तर दुसरे बाजूस बिनलष्करी मदत म्हणून अमेरिकन फौन्डेशन्स व विश्वविद्यालये, जागतिक बँक, विकास मदत गट ही सर्व प्रकारची मदत थायलंडमध्ये ओतीत आहेत. भांडवलशाही जगाची थायलंडला मदत देण्याची अविश्रांत खटपट चालू आहे. रस्ते, धरण व शाळा याकरता भरपूर पैसे व तंत्रज्ञ मिळत आहेत. पाश्चिमात्त्य धर्तीच्या ग्राहकोपयोगी वस्तूंची भली मोठी बाजारपेठ थायलंडमध्ये तयार होत आहे, त्यामुळे स्थानिक भांडवलाला तेजी आली असून उद्योगधंद्यांची वाढ होण्यास मदत होत आहे.

अतिपूर्वेकडील दुसरी दुर्दैवी घटना म्हणजे त्या प्रदेशातील भात उत्पन्न करणाऱ्या व म्हणून थायलंडशी चुरशीचा सामना देणाऱ्या राष्टांचा अधःपात होय. आज भात निर्यात करणारा थायलंड हा जगातील पहिल्या नंबरचा देश आहे ( दुसरा नंबर अमेरिकेचा आहे. ) इतर राष्ट्रातील उत्पादन कमी होत असता थायलंडचे उत्पन्न मात्र हळू हळू वाढत आहे. निर्यात मात्र झपाट्याने वाढली आहे आणि भाताच्या किंमती त्यापेक्षाही जास्त झपाट्याने वाढल्या आहेत.

परदेशी व्यापाराचा ताळेबंद थायलंडला अजून पुरता साधला नसला तरी सरकारी व खाजगी भांडवलाच्या मदतीने थायलंडने आपला देवघेवीचा ताळेबंद चांगला साधला आहे. परकीय चलनाचे साठे एक वर्षाची आयात करण्यास पुरेसे आहेत. परंतु लोकसंख्या मात्र दरवर्षी ३ टक्क्यांनी वाढत आहे. ( भारतापेक्षा जास्त झपाट्याने ) परंतु उत्पादन दरसाल ७ टक्क्यांनी वाढत असून ते आणखी झपाट्याने वाढण्याची पण शक्यता आहे. त्यामुळे थायलंड म्हणजे जगातील एक 'यशोगाथा' आहे असे दिसते.

थायलंड हे फ्रान्सयेवढे राष्ट्र असून त्यांची लोकसंख्या ३·२ कोटी आहे. आग्नेय आशियाच्या मुख्य भूमीवरील हा सर्वात मोठा देश असून मागस राष्ट्रांनी आक्रमिलेल्या दोन पायऱ्या त्याने गाळल्या आहेत. एक म्हणजे वसाहती राज्य व दुसरे म्हणजे लोकशाही स्थापनेचा प्रयत्न. थायलंडने मध्ययुगीन राजेशाहीपासून एकदम लष्करी हुकूमशाही राजवटीपर्यंत उडी मारली आहे. यावर्षी थायलंडला राज्यघटना मिळणार आहे. पुढच्यावर्षी कदाचित् निवडणुकासुद्धा होतील. तोपर्यंत थाई सरकार काय करणार आहे याचा विचार केला म्हणजे पुरे आहे. थाई जनतेला काय वाटते याचा विचार करण्याची जरूरी नाही.

अमेरिकन बॉम्बर्सना थायलंडने तळ बांधून दिला आहे त्याचबरोबर अनेक कुटाळ गप्पांनापण जागा दिली आहे. आता ते अमेरिकेला एक लष्करी तुकडी पुरवणार आहेत. हे कृत्य मात्र थायलंडच्या आतापर्यंतच्या वर्तनाशी सुसंगत नाही. आतापर्यंत ज्या बाजूला आपला फायदा असेल त्या बाजूला ते झुकत असत. थाई लोक सधन बनत आहेत हे मात्र निर्विवाद. तेथील दारिद्र्य रस्त्यावर येण्याइतके विदारक खासच नाही.

थाई लोक स्वप्नाळू असल्यामुळे त्यांचे हातून झटपट कामे होणे अशक्य आहे असे काहींना वाटते. त्याच प्रमाणे ते कट्टर बुद्धधर्मी असल्यामुळे कम्युनिस्टही होणार नाहीत असेही या लोकांना वाटते; पण या गोष्टी अशक्य नाहीत. आज अमेरिकेच्या बाजूला राहून थाई राष्ट्र आपली समृद्धी निश्चित करीत आहेत. दुसऱ्या बाजूला जाऊन मात्र सध्या तरी काहीच आशा नाही.

### भाताचे उत्पन्न उत्तम

थायलंडची आर्थिक व्यवस्था फक्त भाताच्या उत्पादनावर अवलंबून आहे. १० पैकी ८ थाई नागरिक शेतीवर जगतात व १० शेतकऱ्यांपैकी ८ शेतकरी भात पिकवतात. मका, रबर, ज्यूट, मासळी, टॅपिओका व साखर ही इतर उत्पन्नाची साधने होत. फक्त भातावर अवलंबून न रहाण्याची थायलंडची धडपड चालू आहे. सध्या त्यांना जागतिक बाजारात कोणी प्रतिस्पर्धी नाही. व भाताच्या किंमती भरमसाट वाढल्याने थाई व्यापारी व शेतकरी दोघांनाही भरपूर पैसे मिळत आहेत.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अलिकडे भातशेतीवरील मजुरांना कारखान्यातील नोकऱ्यांचे नवे आमिष निर्माण होत आहे. त्याच बरोबर परकीय मदतीच्या साहाय्याने पाटबंधारे व दळणवळणाची साधने सुधारत असल्याने भातशेतीतील उत्पन्न जादा मजूर न लावता वाढविणे शक्य झाले आहे. उत्तरेकडील वैराण मुलखात सुद्धा पाट बंधाऱ्यांचे योगाने शेती सुधारण्याची शक्यता निर्माण झाली आहे. या सर्व संधीचा योग्य फायदा घेण्यास थायलंडला उत्कृष्ट मॅनेजमेंटची गरज आहे.

परंतु ज्या राष्ट्रातील शासनाधिकारी भ्रष्ट व कामचुकार आहेत तेथे चांगली मॅनेजमेंट अस्तित्त्वात येणे कठीण आहे. ब्रह्मदेश व कंबोडिया येथील शेती समाजवादी तत्त्वावर करण्याच्या प्रयोगातील धोके थायलंडने फार जवळून पाहिले आहेत. थायलंडमधील शेती संपूर्णपणे भांडवलशाही पद्धतीवर केली जात आहे. खरे म्हणजे येथे कोणती पद्धती अवलंबून आहे हे सरकारी अधिकाऱ्यांना सुद्धा फारसे माहीत नाही. शेतकरी व व्यापारी यांचे परस्पर संबंध आर्थिकदृष्टया कसे आहेत हेही सांगणे कठीण आहे. तरी सुद्धा भरपूर भात बाजारात येत आहे. शेतकरी आपआपल्या शेतावर एकाकी जीवन जगत असतात. ते कोणत्याही सरकारच्या मदतीच्या व नियंत्रणाच्या कक्षेबाहेर जगतात.

बाजारपेठेत थाई सरकार जरूर तेवढाच हस्तक्षेप करते. त्यांनी ठरवलेले कमितकमी दर फारसे पाळले जात नाहीत. गेल्यावर्षी आंतरराष्ट्रीय बाजारात भाताचे भाव इतके कडाडले की त्यामुळे राष्ट्रीय बाजारपेठेवर त्याचा भयंकर परिणाम झाला. उद्योगधंद्यातील मजूरांचे पगार व मुलकी अधिकाऱ्यांचे पगार यावर झालेल्या दुष्परिणामाने घाबरून जाऊन भाताची निर्यात थांबवावी असा निर्णय थाई सरकारने घेतला. या कोंडीतून मार्ग कसा काढावा याचा विचार चालू असून राष्ट्रीय किंमती वाढू न देता निर्यात वाढविण्यास किंमतीवर नियंत्रणे घालण्यासाठी एका मंडाळाची नियुक्ति झाली आहे. या मंडळाला या महत्त्वाच्या निर्यात-बाजारपेठेवर नियंत्रण घालणे सोपे जाणार नाही. घरच्या व बाहेरच्या सामान्य नागरिकाच्या आवाक्यात भाताच्या किमती आणाव्यात हेही एक मंडळांचे उद्दिष्ट आहे. परंतु भरपूर उत्पादन करावे व ते विकावे म्हणजे आग्नेय आशियातील सर्व प्रश्न सुटतील असे थाई लोकांना वाटते.

## वाढीची दुःखे

राष्ट्रातील तीन चतुर्थांश उत्पादन शेतावर काम न करणाऱ्या २० टक्के लोकांच्या हातात आहे. पाटबंधारे व सुधारलेली दळणवळणाची साधने शेतमाल बाजारात भरपूर प्रमाणात देण्यास मदत करतात. ट्रॅक्टरच्या साहाय्याने शेतावरील दोन महिन्याचे काम दोन दिवसात करता येते. आधुनिक औद्योगिक अर्थव्यवस्थेची पार्श्वभूमी आज थायलंडमध्ये तयार आहे.

मोठया शहरातून औद्योगीकरणाची पहाट स्पष्ट दिसत आहे. ठिकठिकाणी लहान लहान कारखाने निघत आहेत. सामान्य माणूस यंत्रे वापरण्याचे शिक्षण घेत आहे. ट्रक्स व मोटारी जुळवण्याचे सात कारखाने अस्तित्वात आले असून मोटार कारखाना सुरू करण्याची तयारी सुरू झाली आहे. सध्या माध्यमिक उद्योगधंद्यावर जोर आहे. कच्चे टिन निर्यात करण्याचे बंद होऊन अमेरिकन मार्गदर्शनाखाली टिन स्वच्छ करण्याचा कारखाना देशात सुरू करण्यात आला आहे. काच, तेल, कागद व सिमेंट यांच्या उत्पादनास सुरवात झाली आहे. लोखंडाच्या मोडीपासून शुद्ध लोखंड तयार करण्याचे एक दोन कारखाने सुरू झाले असून पोलादाचा कारखाना लवकरच निघेल असे वाटते. आपल्याला लागणाऱ्या खताचे उत्पादन करून तेल शुद्धीकरणाचा कारखाना पण लवकरच निघण्याची शक्यता आहे.

कसबी कामगारांचा तुटवडा असला तरी साधे मजूर पाहिजे तेवढे मिळू शकतात. मजूर संघटणा अस्तित्त्वात नाहीत व मजूरीचे दरही फार कमी आहेत; परंतु अमेरिकन लष्कराचा किंवा त्यांच्या कारखान्यात नोकरी करणाऱ्या मजूरांचा पगार चांगला असून तोच मालक म्हणून मानण्यात येतो.

या सर्व बदलात काही धोके स्पष्ट आहेत. सुस्त व आळशी समाजात बेचैनी वाढत आहे तर आळशी व शांत पण स्थिर अर्थव्यवस्थेत चलनवाढ









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. आर्थिक विकासाच्या मार्गात भांडवल किंवा कच्च्या मालाची कमतरता उभी नसून माणसे उभी आहेत. बँकॉक हे एकच एक भले मोठे बंदर सदैव गच्च भरलेले असते कारण तेथील माल चटकन हालतच नाही. रस्त्यावरील वहानांची तीच परिस्थिती. सर्वत्र ढिलाई व आळस. शाळा बांधायला पैसे आहेत तर शिक्षक नाहीत. शेतकऱ्यांना नव्या पद्धती शिकवणारे तज्ञ नाहीत. अशा सारख्या अनेक गोष्टींमुळे विकासाच्या मार्गात अडथळे निर्माण होत आहेत.

### कारभार कोणाचा ?

हे वर्ष म्हणजे थायलंडच्या दुसऱ्या पष्ठवार्षिक योजनेचे पहिले वर्ष आहे. त्यात २५०० मिलियन डॉलर्स खर्च होणार असून ४०० मिलियन डॉलर्स परकीय मदत म्हणून व २५० मिलियन डॉलर्स लष्करी मदत म्हणून मिळणार आहेत. सरकारी यंत्रणा हा सर्व कारभार करण्यास असमर्थ आहे. सर्व अर्थ-व्यवस्था खाजगी हातात आहे. येथील उच्च श्रेणीचे-शासनाधिकारी श्रीमंत घराण्यातील असून परदेशातून शिक्षण घेऊन आलेले आहेत. त्यामुळे त्यांचेत सचोटी सापडते. त्यांच्या कचेऱ्या एअर कंडिशन्ड असून देशाचे उज्वल भवितव्य त्यांना दिसत असते. परंतु त्यानंतरचे सर्व सरकारी नोकर भ्रष्ट आहेत. त्यांची संख्या जरूरीपेक्षा दुप्पट असून यांचे पगार अत्यंत कमी आहेत. पोलिस किंवा प्राथमिक शिक्षक यांचा पगार महिन्यास अवघा २२॥ डॉलर्स आहे. या सर्वांचा परिणाम म्हणून लांचलुचपत भरपूर व सर्वत्र आढळते मंत्र्यापासून सर्वांनाच पैसे खाण्याची सवय झालेली आहे. एखाद्या मोठ्या अधिकाऱ्याने पैसे खाल्ले याबद्दल कोणाला काहीच वाटत नाही. त्या गोष्टीचा बोलबाला झाल्यास मात्र आश्चर्य वाटते. खालच्या तळातील अधिकाऱ्यात तर लांचलुचपत इतकी बोकाळली आहे की त्यामुळे राज्ययंत्रणेस धोका निर्माण होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. याला एकच उपाय आहे व तो म्हणजे पगारवाढ. परंतु सरकारी नोकरांची संख्या इतकी भरमसाट वाढली आहे की ती कमी केल्याखेरीज पगारवाढ केल्यास वाढलेल्या खर्चाचा भार अर्थव्यवस्था सोसू शकणार नाही.

खरे म्हणजे या सर्वावर एकच बिनतोड उपाय आहे व तो म्हणजे शिक्षण होय. चार वर्षे सक्तीचे शिक्षण नावाला आहे, दरसाल या वयाच्या एक लक्ष बालकांची विद्यार्थीसंख्येत भर पडत आहे. शिक्षकांचा अभाव आहे. असलेल्या शिक्षकांना इंग्रजी येत नाही. काहीच येत नाही. त्यांना उत्तम शिक्षण देणे म्हणजेच थायलंडला मदत करणे होय, असे दिसत आहे. अस्तित्वात असलेल्या तिन्ही विश्वविद्यालयांची परिस्थिती शोचनीय आहे. दहा दहा वर्षापूर्वीच्या नोटस् वरून प्राध्यापक विद्यार्थ्यांना शिकवत असतात. शिआटो अमेरिकन फौंडेशन्स व पीस कोडार्स हा दर्जा, उंचावण्याची पराकाष्ठा करीत आहेत.

### लष्करी सामुग्री व मदत

गेल्या वर्षी थायलंडची आयात ४० टक्क्यांनी वाढली. परंतु बिनलष्करी मालाची आयात मात्र १३ टक्क्यांनीच वाढली. अमेरिका दरवर्षी जवळ जवळ १०० मिलियन डॉलर्स रूपाने मदत थायलंडमध्ये खर्च करीत आहे. त्यातील ६० मिलियन लष्करी मदत आहे. त्याशिवाय येथे ३५००० अमेरिकन लष्कर असून ते पण भरपूर खर्च करीत असते. त्याशिवाय व्हिएटनाममधून थकले भागलेले अमेरिकन सैनिक विश्रांतीसाठी थायलंडमध्ये दररोज येत असतात. अमेरिकन व युरोपिअन प्रवाशी दरसाल भरपूर पैसा येथे खर्च करतात. या सर्वांना लागणाऱ्या ग्राहकोपयोगी वस्तू आयात कराव्या लागतात. या मालावरील आयात कर थाईसरकार गोळा करीत असते. त्याशिवाय कस्टम ड्युटी आहेच.

यामुळे थाईअर्थव्यवस्थेवर पुष्कळच परिणाम झालेला आहे. थाईसरकार स्थानिक जुळवणी ( Assembly Plants ) कारखान्यांना उत्तेजन देत असून जपान त्याचा भरपूर फायदा घेत आहे. अमेरिकन अस्तित्वाचा सर्वात महत्त्वाचा परिणाम रस्ते बांधणीवर झालेला आहे. अमेरिकन लष्कराने मदतीच्या बाहेर कितीतरी मैल उत्तम रस्ते तयार केले आहेत. त्यांनी एक प्रचंड विमानतळ बांधला असून खोल पाण्याचे बंदरही तयार केले आहे. ही दोन्ही जर नागरी दळणवळणाकरता वापरावयास



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दिली तर थायलंडच्या अर्थव्यवस्थेस पुष्कळच पुष्टी मिळेल. विमानतळाजवळ सॅटेलाइट कम्युनिकेशन सेंटर बांधण्यात येत आहे.

अमेरिकन लष्कराला दळणवळण सुधारण्यास उद्युक्त करणे सोपे आहे. जेथे म्हणून कम्युनिस्ट गडबड करीत असतील तेथे खर्चाचा विचार न करता अमेरिकन्स रस्ते बांधतात हे थाईसरकारने पुरते ओळखले आहे.

थायलंडमध्ये आग्नेय आशियातील इतर देशातील नागरिक पण पुष्कळ आहेत. त्या सर्वात महत्त्वाचा गट म्हणजे ३० लक्ष चीनी लोकांचा होय. यातील अर्धे चिनी बँकाकमध्ये असून बाकीचे इतर शहरातून आहेत. ते थाईनागरिकात लग्ने करून व बुद्ध धर्म स्वीकारून मिळून जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. थायलंडमधील व्यापार बऱ्याच प्रमाणात त्यांचे हातात आहे.

थायलंडच्या सरहद्दीवरील अमेरिकन वर्चस्वाचे रिपोर्टस् खरे मानणे परकीय माणसास जड जाते. कम्युनिझमने संत्रस्त केलेल्या राष्ट्रास अमेरिकन मदतीने ऊर्जितावस्था येऊ शकते हे माहीत असलेल्या लोकांनीच त्या अफवा उठवण्याची शक्यता आहे.

## प्रादेशिक स्वप्न

थायलंड हे नेहमीच स्वतंत्र राष्ट्र म्हणून अस्तित्वात राहिले. एका बाजूला ब्रह्मदेशाची ब्रिटिश वसाहत व दुसरे बाजूस इंडोचायनाची फ्रेंच वसाहत. त्याच्या सीमा वांशिकतेने ठरल्यासारख्या दिसत आहेत. परंतु आर्थिक सीमा मात्र त्यांच्याशी जुळत नाहीत. या राष्ट्राला इतर राष्ट्रांशी सहकार्य करण्याची इच्छा आहे. थायलंड सिआटोचे फौंडर मेंबर आहे; कोलंबोयोजनेचा फायदा त्याने उठवला आहे व संयुक्त राष्ट्रसंघाच्या आर्थिक कमिशनचे ते आशिया व अतिपूर्वेकडील केंद्र आहे परंतु ते शेजाऱ्यांशी भांडणाचे प्रसंग टाळतात– त्यांना गप्पा मारायला बोलावतात. त्यांच्या स्वप्नाळू स्थिती मागे आशिआई व्यवहारात जपानची बरोबरी करण्याचे स्वप्न नसेलच असे मात्र सांगता येत नाही.

—दि इकॉनॉमिस्ट, ६ मे १९६७.

## दोन चित्रे

ब्रिटनमध्ये वंशद्वेष पहिल्यापासूनच भरपूर आहे. अलिकडे जवळजवळ सव्वासहा लाख निर्वासितांच्या आगमनाने हा द्वेष वाढीस लागलेला दिसत आहे. काळाकुट्ट आफ्रिकी निग्रोपासून, कॉफीच्या रंगाच्या जमेकन नागरिकांना वा आर्यवंशीय पाकिस्तानी नागरिकांना 'काळा आदमी' ही संज्ञा दिली जाते. फार काय सायप्रस व ग्रीस येथील नागरिकांनासुद्धा तीच संज्ञा लावण्यात येते. आणि साहजिकच या सर्वांचेशी वागण्यात तुसडेपणा येतो. दोन वर्षापूर्वी ब्रिटिशपार्लमेंटने हॉटेल्स, रेस्टोरॉं, नाट्य व सिनेमागृहे व सार्वजनिक वाहतुकीची साधने यातील वंशभेद नष्ट करण्याचा कायदा काहीसा नाइलाजानेच पसार केला. त्याची अंमलबजावणी होणे जवळजवळ अशक्यच आहे. तो कायदा मोडल्याबद्दल दोन वर्षात कोणासही शिक्षा झालेली नाही. या कायद्याचा रहाती घरे किंवा नोकऱ्या यावर काहीही परिणाम झालेला नसून ब्रिटनमध्ये स्थायिक होऊ पहाणाऱ्या निर्वासितांच्या वाटेतील ती फार मोठी अडचण आहे.

गेल्या आठवड्यात विल्सन सरकारने काळ्या निर्वासितांच्या जीवनावर प्रकाश टाकणारा १४१ पानी रिपोर्ट प्रसिद्ध केला. त्यावरून ३६ टक्के निर्वासितांनी नोकऱ्यातील भेदभाव अनुभवल्याचे समजते. अर्ध्यापेक्षा अधिक लोकांना मोटारीचा विमा उतरवणे कठीण होत असून जास्त पैसे भरल्यासच ते शक्य होत आहे. घरदार करून राहू इच्छिणारांना रिकामी घरे मिळणे दुरापास्त झाले आहे.

विशेषतः कसबी निर्वासितांना नोकऱ्या मिळणे जड जात आहे. वेस्ट इंडीज सुतारांबरोबर गोरे सुतार काम करण्यास तयार नाहीत, तर गॅस पाइप दुरुस्त करणाऱ्या पाकिस्तानी कामगाराला गोऱ्या घरातून प्रवेश नाही. काही ठिकाणी 'काळा आदमी' नोकरीस नको म्हणून स्पष्ट सांगितले जाते.

रेस रिलेशन बोर्डाने मिळवलेली माहिती यापेक्षा वेगळी असणे शक्य नाही. मजूर सरकार वंशभेद कमी करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहे. गेल्या



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दहा वर्षात वंशभेद नष्ट करण्याकरता पार्लमेंटच्या बैठकीत कमीतकमी दहा बिलावर चर्चा झाली पण ती सर्व फेटाळली गेली. अजूनही वातावरण सुधारण्याची चिन्हे नाहीत. नोकऱ्यातील वंशभेद कमी करण्याकरता बोलावलेल्या मजूर पुढाऱ्यांच्या परिषदेवर संपूर्ण बहिष्कार घालण्यात आला.

## अमेरिकन विश्वविद्यालये

अनेक निग्रो कुटुंबातून आपल्या मुलांना अमेरिकेतील उत्तमोत्तम विश्वविद्यालयातून प्रवेश मिळेल की नाही याबद्दल चिंता व्यक्त केली जात आहे. परंतु आज तरी हायस्कूल मधून उत्तम तऱ्हेने पास होणाऱ्या निग्रो मुलांचा भाव वाढला आहे. ॲम्हर्स्ट विद्यापीठाचे प्रवेशाधिकारी श्री. युजेन विल्सन यांचे म्हणण्याप्रमाणे 'एक वेळ प्रवेश मिळवणाऱ्या विद्यार्थ्यांची गुणांची सरासरी किती आहे यावर विद्यापीठाची प्रतिष्ठा अवलंबून होती. त्यानंतर काही काळ मेरीट शिष्यवृत्त्या मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांच्या संख्येवर ती अवलंबून होती आज मात्र विद्यापीठात किती निग्रो विद्यार्थी प्रवेश घेतात यावर ती अवलंबून आहे.

पाच वर्षापूर्वी येलविद्यापीठात फक्त १२ निग्रो विद्यार्थी होते आज त्यांची संख्या ४० आहे. कोलंबियात दोन वर्षात निग्रोंची संख्या १६ वरून ५६ वर गेली आहे. तर शिकागो विद्यापीठात ती १० वरून ७५ वर गेली आहे. हारवर्ड विद्यापीठात विद्यार्थ्यांची वांशिक गणती करण्याची पद्धती नाही तरी तेथेही आज १६० पेक्षा जास्त निग्रो विद्यार्थी शिकत आहेत. स्टॅनफोर्ड मानसशास्त्रज्ञ श्री. ॲलन यांचे म्हणण्याप्रमाणे आज हुशार निग्रो विद्यार्थ्यांना उत्तम फुटबॉल खेळाडू इतकाच भाव आहे.

## सुरवातीची साशंकता

शिकागोच्या सर्व निग्रो हायस्कूलमध्ये जेव्हा हुशार विद्यार्थ्यांबद्दलची चौकशी विद्यापीठांनी सुरू केली तेव्हा 'आपले स्वप्न साकार' झाल्याचा आनंद तेथील विद्यार्थ्यांना झाला. जवळ जवळ ३०० कॉलेजेस मधून चौकशी वा प्रवेशपत्रिका काही हुशार विद्यार्थ्यांकडे आल्या. ४०७ विद्यार्थ्यांच्या वर्गात चौथा आलेल्या जॉर्ज लेन या विद्यार्थ्याने शिकागो, नॉर्थवेस्टर्न लोयोला व प्रिन्स्टन या विद्यापीठांकडे प्रवेशाकरता अर्ज भरले. त्याला प्रिन्स्टन खेरीज सर्वांचा होकार आला. त्याने शिकागो विद्यापीठाच्या वैद्यकीय कॉलेजात प्रवेश केला असून त्याला नॅशनल मेरिटशिष्यवृत्ति व इलिनॉइस स्टेट शिष्यवृत्ती मिळून सालिना २५०० डॉलर्स मिळणार आहेत. याचे सर्व श्रेय तो आपल्या शिक्षकांना देतो. कारण पार्कर हायस्कूल मधील शिक्षकांनी प्रथमश्रेणीच्या तीस विद्यार्थ्यांचे वर कसून मेहनत करून त्यांना विश्वविद्यालयीन शिक्षणासाठी तयार केले. अशा अनेक विद्यार्थ्यांची उदाहरणे आज अमेरिकेत सापडत आहेत. अभ्यासातील हुशारी व खेळातील प्रावीण्य या दोन गुणांवर आज निग्रो मुले 'संपूर्ण मानव' ( Complete man ) बनण्याचा प्रयत्न करीत आहेत.

## तात्कालिक निग्रोकरण

सध्या अमेरिकन विद्यापीठांना निग्रोकरण करण्याची घाई झालेली दिसते. अनेक शाळा कॉलेजे आपले निग्रोविरोधी धोरण अल्पकाळात बदलून टाकण्याच्या प्रयत्नात दिसत आहेत. अनेक संस्थांना आपले निग्रोकरण करीत असताना समाजातील निग्रोंचे स्थान सुधारण्याची इच्छा आहे. कॉलेजातील निग्रो विद्यार्थ्यांचे अस्तित्व तेथील वातावरणात थोडीबहुत वास्तवता निर्माण करते. असेही अनेकांना वाटते. मोठमोठ्या हवेतील गप्पांचा व रिकाम्या ध्येयवादाचा कंटाळा आलेला आहे.

टाइम, २९ एप्रिल १९६७



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

